॥ श्री ॥

नाट्यरूप शिंदेशाहीचें द्वितीय नाट्यपुष्प

# मुतालकी



श्री. पहिले जयाजीराव शिंदेराव.



नाटककार—

रामराव सुभानराव बर्वे, एम्. ए.,

प्रधानाध्यापक, जीवाजीराव विद्यालय, लष्कर.

प्रथमावृत्त
५००

मूल्य
सव्वा रुपया

॥ श्री ॥

नाट्यरूप शिंदेशाहीचें द्वितीय पुष्प

# 'मुतालकी'

---


नाटककार—

रामराव सुभानराव बर्गे, एम्. ए.,

प्रधानाध्यापक, जीवाजीराव विद्यालय, लष्कर.


---


मुद्रक

आलीजाह दरबार प्रेस, लष्कर,

ग्वाल्हेर.

---

१९४३

प्रथमावृत्ति ५०० ]    संवत २००० वि०    [ मूल्य सव्वा रुपया:

॥ श्री ॥

# कैलासवासी श्रीमन्मातोश्री श्रीगजराराजासाहिबा

यांचे पदकमलीं

# अर्पण.

ज्यांचा जन्म महाराष्ट्रांतील गोमांतक प्रांतांत अगर्दी कोंकणच्या विभागांत असलेल्या दूरच्या गांवीं झाला! ज्यांच्या पितृ-मातृ घराण्यानें इतिहासांत एक विशेष प्रकारची कामगिरी करून आपला मराठी बाणा आजपर्यंत कायम ठेविला आहे! ज्यांचें बालपण एका परकीय सत्तेखालीं असलेल्या, पण कुळाचार व कुलधर्म यांचा आदर्श असलेल्या इतिहासप्रसिद्ध सरदेसाई राणे घराणें, यांच्या बाणेदार व तेजस्वी पुरुषांच्या व मातांच्या देखरेखीखालीं व्यतीत झालेलें होतें! ज्यांच्या पूर्व जन्मींच्या पुण्याईनें व बाळपणीं देवधर्म, देवार्चन केल्यामुळें त्यांना ग्वाल्हेरच्या प्रजेच्या माता बनण्याचें सौभाग्य लाभलें! ज्यांच्या पूर्व संस्कारांमुळें व ज्यांच्या सुदैवामुळें कै. राजर्षि त्यांना पति लाभले! ज्यांच्या भाग्यानें कै. मातोश्री चिनकूराजासाहिबां सारख्या मातेसमान वडील भगिनी लाभल्या! ज्यांनीं त्यांच्या दोन्हीं बालकांना मातृप्रेमापेक्षां प्रेमाची पांखर पसरून दिव्य माणसें कशीं असतात याचें उत्कृष्ट उदाहरण जगाला दाखवून दिलें. दोन्हीं जगन्मातांच्या कृपा आशीर्वादांत वाढलेली दोन दिव्य बालकें खेळतां बागडतांना पाहून, विद्याव्यासंग करितांना पाहून, व पुढील आयुष्यांतील कर्तव्यकर्मे पार पाडण्याकरितां सतत कर्तव्यतत्पर असलेलीं पाहून, एका दिव्य भावी कालाची सुखस्वप्नें ज्यांना पडत होतीं! ज्यांच्या महाराष्ट्र-संस्कृतीच्या अभिमानानें थोडी कठोरता आली असली तरी त्यांमध्यें प्रख्यात शिवछत्रपतींच्या श्रीजीजामातेची जाणीव होती! दिव्यकन्येला एका दुसऱ्या राज्याचे महाराणीपद चालवावयाचें आहे, ही जाणीव ठेवून ज्यांनीं महाराष्ट्र-संस्कृतीचें पूर्ण आदर्श शिक्षण त्यांना दिलें होतें! ज्यांनीं आपल्या पुत्रांस हिंदवीस्वराज्याचे भावी कालीं सुकाणूं घ्यावयाचें आहे या कल्पनेनें बालपणापासूनच श्रीशिवछत्रपतींच्या चरित्रांतील अनेक इतिहासप्रसिद्ध पुण्यकृतींचें धडे गिरवावयास लाविले होते! ज्यांनीं प्रजा आपलीं बालकें आहेत याची जाणीव बालवयापासून आपल्या राजपुत्रांस करून दिली होती! ज्यांनीं कर्तव्यनिष्ठतेकरितां राजपुरुषानें वाटेल ते कष्ट सोसावे अशी उत्कृष्ट भावना ज्यांच्या हृदयांत कायमची स्थिर करून ठेविली आहे! ज्यांनीं पांच एक वर्षे स्वतः कारभार पाहून राज्यकारभाराचें वळण आपल्या चिमुकल्या शिवछत्रपतीस लावून दिलें! त्या कै. श्रीमंत मातोश्री महाराणी गजराराजासाहिबा यांच्या पदकमलीं ही श्री नाटचरूप शिंदेशाहींतील द्वितीय नाट्यकृति भक्तिभावानें व नम्रतेनें अर्पण करीत आहे.

सर्व जनताजनार्दनाचा दास—

ग्रंथकर्ता.

# आशीर्वादाच्या रूपानें

इतिहास हा मूळांतच लिकष्ट आहे खरें. किंबहुना सामान्य जनतेंत ह्या विषयाची उपेक्षाच होते. एवढेंच नव्हे तर कांहींच्या एकांगी मताप्रमाणें या जीर्ण शीर्ण समाधि उकरून कांहींच निष्पन्न होणें नाहीं व त्यापासून मानव-जातीच्या उत्क्रांतीला पण मदत होणार नाहीं. आजचे जे जिव्हाळ्याचे प्रश्न, हेच त्यांच्या एकांगी मतप्रणालीमुळें समाजाच्या हिताचे प्रश्न आहेत. परंतु ज्या राष्ट्रास आपला असा इतिहास नाहीं त्या राष्ट्राचा भाग्योदयही जवळ जवळ अशक्यच. इतिहासाच्या जुन्या पुराण्या बाडांतूनच पूर्वजांच्या शौर्य, पराक्रम, इत्यादिकांच्या वर्णनानेंच राष्ट्रांत नवजीवन येतें व प्रसंगीं स्वदेश व स्वधर्मासाठीं आत्मसमर्पण करण्याची स्फूर्ति होते.

* मराठ्यांच्या इतिहासांतील विशेषकरून शिंदेशाहीच्या कांहीं विशिष्ट ऐतिहासिक घटनास नाट्यरूपी पेहराव चढवून इतिहास अधिक सुलभ व मनोरंजक करण्याचा स्तुत्य उपक्रम रा. रा. रामराव सुभानराव बर्गे, एम. ए., प्रधानाध्यापक श्रीजीवाजीराव विद्यालय, लष्कर, यांनीं केला आहे व त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें योग्यच होईल.

इंग्लिश, फ्रेंच व ग्रीक इत्यादि पाश्चिमात्य भाषांतही त्या त्या राष्ट्रांच्या ऐतिहासिक घटनांवर नाटकें लिहिलीं गेलीं व तीं लोकशिक्षणाच्या दृष्टीनें रा. बर्गे यांचीं नाटकें मराठा तरुणास पराक्रमाची अभिलाषा उत्पन्न करतील अशी दृढ आशा आहे.

लष्कर, तारीख १३ नोव्हेंबर १९४३

श्री. ले०-क० सरदार माधवराव रामराव फाळकेसाहेब,
समशेरजंग बहादूर, मुख्त्यारउद्दौला,
मुलकी सचिव, ग्वाल्हेर राज्य.

*"मराठ्यांच्या पूर्वजांची शौर्य, पराक्रम, स्वार्थत्याग व अतुल स्वामिनिष्ठा यांची उज्वल परंपरा आजच्या जित व हत महाराष्ट्रांत नव चैतन्य निर्माण करील

# थोरांचें हृद्गत

'नाट्यरूप शिंदेशाही' या मालेंतील दुसरें पुष्प म्हणजे प्रस्तुतचें 'मुतालकी' हें नाटक होय. या नाटकांत 'नाट्य' कितपत आहे ह्याची चिकित्सा नाट्यशास्त्रज्ञ करतीलच पण या नाटकाच्या प्रकाशनानें मराठी ऐतिहासिक नाटकांच्या साहित्यांत एक चांगली भर पडली आहे असें मला वाटतें. नाथमाधवांची 'कादंबरीमय शिवशाही' हडपांची 'कादंबरीमय पेशवाई' त्याचप्रमाणें श्री. बर्गे यांची 'नाट्यरूप शिंदेशाही' वाङमयांत मानाचें स्थान पटकवील.

राजे जयाजीराव शिंदे यांना उत्तरेकडील मुतालकीचीं वस्त्रें व अधिकार मिळाल्यापासून जयपुरच्या गादीवर माधोसिंग विराजमान होईपर्यंतच्या घटना नाट्यरूपानें या नाटकांत आलेल्या आहेत. अंग राखून काम करणारे, स्वतःच्या फायद्याकडे पाहूनच काम अंगावर घेणारे, शिंदे वरचढ होत आहेत असें पाहून त्यांच्या विरुद्ध कारस्थान करणारे सुभेदार मल्हारराव होळकर; मराठी राज्याची पत टिकविण्यासाठीं स्वतःला मिळालेले मुतालकीचे अधिकार न गाजविणारे व आपसांत दुही निर्माण होऊं नये म्हणून पडतें घेणारे त्यागी जयाजीराव; मराठ्यांतील दुही नष्ट करूं पहाणारी धर्मपरायण, सात्विक पण तेजस्वी सती अहल्याबाई इत्यादि भूमिकांचें स्वभाव-चित्रण वाचकांचें मनरंजन खास करील. इतिहास वाचण्याची प्रवृत्ति सामान्य वाचकांचे ठिकाणीं सहसा आढळून येत नाहीं. म्हणून ऐतिहासिक कथाभागास नाटकाचें रूप देऊन तो वाचकांपुढें ठेवल्यास लोकशिक्षण व मनोरंजन हे दोन्ही हेतु साध्य होत असतात. त्या दृष्टीनें हा प्रयत्न प्रशंसनीय आहे. सर्व संवादांतून ऐतिहासिक घटना विशद करण्याचा यत्न चांगला केला आहे. पण एकंदरींत त्यांत 'नाट्य' आढळून येत नाहीं असें मात्र मला वाटतें. पुढील कृतींत नाट्यास अधिक अवसर मिळेल अशी अपेक्षा करतें.

नाटकावर अभिप्राय देण्याचा अधिकार माझा खास नाहीं, कारण नाटकांचा व माझा आतांपर्यंतचा संबंध फक्त करमणुकीपुरताच आला आहे तरी पण अभिप्राय लिहिण्याचें हें नाटक केवळ लेखकाच्या आग्रहाच्या विनंतीमुळें पार पाडावें लागलें आहे. लेखकानें हातीं घेतलेली ही योजना निर्विघ्नपणें शेवटास जावो अशी इच्छा प्रदर्शित करून एथेंच लेखणीला विराम देतें.

जयेंद्रगंज लष्कर,
१३-११-४३.

कृष्णाबाई फाटक,
बी. पी. एन्. ए., पी. एच्. एन्. (लन्डन).

# हकीकत



नाट्यरूप शिंदेशाही लिहिण्याचा निश्चय झाला. शिंदेशाही राजघराण्यांत एकापेक्षां एक थोर पराक्रमी पुरुष होऊन गेले आहेत; प्रत्येकाच्या आयुष्यांत अनेक हृदयस्पर्शी प्रसंग घडून आले असल्यानें त्या प्रत्येक घटनेवर एक एक नाटक लिहिण्याचा हेतु धरून कार्यास आरंभ केला.

पहिलें नाटक "मधु-मीलन", शिंदेशाहीचे आद्य संस्थापक श्री. राणोजीराव महाराज ह्यांच्या कारकीर्दीतील एका सुमंगल प्रसंगावर लिहिलें आहे. महाराजांना तीन राण्या होत्या. श्री. मैनाबाई-साहिबा व श्री. अन्नपूर्णाबाईसाहिबा या मराठा जातीच्या होत्या व श्री. चिमणाबाईसाहिबा ह्या राजपूत राजकन्या होत्या. श्री. राणोजीराव शिंदेराव व श्री. चिमणाबाई साहिबा ह्यांचा विवाह कसा घडून आला; त्या विवाहांत कसलें थोर व गूढ राजकारण होतें; व त्या मधु-मीलनापासून काय साध्य झालें हें पहिल्या नाटकांत दाखविलें आहे. राजपूत-मराठा-ऐक्य हा त्या नाटकाचा मुख्य विषय आहे. श्री. महादजी महाराज, ज्यांनीं मराठेशाहीचा पर्यायानें हिंदुपदपातशाहीचा कळस गांठला ते ह्या दोन थोर विभूतींच्या पोटीं जन्मास आले. येथपर्यंतची कथा या नाटकांत आली आहे.

दुसरें नाटक "मुतालकी" ह्याचें कथानक दुसरीकडे दिलें आहे. "जयपुर-प्रकरण" हें श्री. जयाप्पा ऊर्फ जयाजीराव शिंदेराव ह्यांच्या आयुष्यांतील महत्त्वाचें राजकारण आहे. मराठ्यांची शक्ति या कामीं फार खर्च झाली, व शिंदे-होळकरांच्या बेबनावास येथून जोरानें सुरुवात झाली.

श्री. पहिले बाजीरावांचे कारकिर्दींत इ. स. १७३१ मध्यें श्री. राणोजीरावबाबांच्याकडे उत्तर मराठेशाहीची मुतालकी आली होती. "लिंगोजी माने याजबरोबर सरकारी शिक्के पाठविले आहेत. तुमचे विचारास आल्यास मल्हारजी होळकर यांजवळ देणें अगर तुम्हांजवळ ठेवणें" अशा प्रकारचा उल्लेख त्या वेळच्या पत्रव्यवहारांत आहे. श्री. राणोजीरावबाबा हे सर्वांच्या सल्यानें उत्तरेकडील मुतालीक म्हणून कायम झाले. अर्थात् शिंदे-होळकर हा वाक्प्रचार केवळ उच्चाराच्या सोयीसाठीं किंवा शब्दांच्या अक्षरसंख्येवरून रूढ झालेला नसून त्याला ऐतिहासिक सत्याचा पूर्ण पाठिंबा आहे.

निजामांचा पूर्ण पराभव केल्यावर त्यांच्याशीं जो तह झाला त्यांत जमानतदार म्हणून बादशाही करारनाम्यावर श्री. राणोजीरावबाबांची पहिली सही आहे. पुढेंही असे पुरावे अनेक देतां येतील. यावरून मराठी साम्राज्य वाढविण्यांत शिंदेराव घराण्याची नेहमीं आघाडी असून जबाबदारीची उत्तरे-कडील सर्व कामें बहुतकरून त्यांनाच पार पाडावी लागत यांत संशय नाहीं.

श्री. राणोजीरावबाबांच्या मृत्यूनंतर श्री. जयाजीराव राजे व श्री. मल्हारराव ह्यांचें उत्तर हिंदुस्तानी राजकारणांत पटूं शकलें नाहीं. श्री. मल्हाररावांची दृष्टि खोल नव्हती. त्यामुळें जयपुर-प्रकरणांतील शिंदे-होळकरांचा बेबनाव जगजाहीर झाला. श्री. मल्हाररावांचें धोरण नेहमीं धरसोडीचें असे. तें श्री. राणोजीरावबाबा व श्री. जयाजीराव राजे यांना मुळींच खपत नसे. या धरसोडीमुळेंच मराठ्यांची उत्तर हिंदुस्तानांत अत्यंत बदनामी झाली व राजकारण ढिलें पडूं लागलें. त्या वेळचे पेशव्यांचे रामचंद्रबाबांस जें पत्र आलें त्यांतील भाग वांचल्यावर "मुतालकी" नाटकाचा विषय सहज कळणार आहे.

"तुमचा व मल्हारजी होळकरांचा परस्पर पेच बाढला आहे. म्हणोन वर्तमान बहुधा मुखें ऐकिलें जातें. ऐशास आपले घरांत सरबारांत काडीमात्र द्वैतभाव नसावा, हा उत्तम पक्ष आहे. तथापि घर आहे तेथें बोलाचाली आहेच, परंतु परस्पर रुष्टता कोणी बाळगीत नव्हते. सर्वही एकचित्तें करून ज्यांत धन्याचें हित व नक्ष तोच मनसुबा करीत गेले. सर्व प्रकारें या दौलतीचे तुम्हीं स्तंभ आहां. उचित मनसुबा असेल तो करितां, करालच संदेह नाहीं. परंतु घरांत घरभेद सर्वस्वी नसावा. सारांश बाहेर वाईट न दिसे, घरकलहामुळें दौलतीची उचित कार्यास अटकाव न पडे ती योजना जेणेंकरून होय, ते सत्वर करून त्यांस समजावून घेऊन यावें. तुम्हीं मल्हारबाच्या चित्तांतील किल्मिष दूर करून त्यास घेऊन त्वरेनें येणें." (रा. ब. पारसनीस पत्र संग्रह).

त्याच पत्रांत पेशवे विशेषतः श्री. जयाजीरावांना उद्देशून लिहितात. "सरदार, एकदील, मर्द, कर्ते, अस्मानही कडाडलें तरी आपल्या मर्दानगीस, हिंमतीस अंतर करणार नाहींत; व केलें नाहीं. ज्यांच्या मर्दुमी व दिलेदारीची तारीफ सर्वही करितात". आणखी दुसऱ्या पत्रांत पेशवे श्री. जयाजीराव शिंदेराव यांना लिहितात. "शाबास तुमच्या हिमतीची व दिलेरी रुस्तुमीची व शाबास लोकांची! आमच्या दक्षिणच्या फौजांनीं यमुना-गंगा पार होऊन रोहिले पठाणांशीं युद्ध करून आपण फत्ते पावावें हें कर्म लहान, सामान्य न जालें! तुम्हीं एकनिष्ठ, कृतकर्मे सेवक ह्या दौलतीचे स्तंभ आहां!! जें चित्तावर धरितां तें घडून येतात. पहिली यशावह कर्में संपादिलींत ततोऽधिक यश संपादिलें. या यशास जोडाच नाहीं. इरान तुरान पावेतों लौकिक जाला कीं, वजीर मोडला, पळाला असतां फिरोन फत्तेच्या मसनदीवर बसविला. याजहून यश कोणतें अधिक आहे. इत्यादि" यावरून श्री. जयाजी-राव राजे यांच्या स्वभावाची चांगली ओळख होते.

"मुतालकी" हेंच शिंदे-होळकरांच्या वैमनस्याचें मूळ कारण होतें हें स्पष्ट होत आहे. त्यांच्या चित्रांत हेंच किल्मिष होतें. व तें वरचेवर काढण्याचा प्रयत्न झाला. शक्य तितकी ऐतिहासिक घटना सांभाळून कथानकाची मांडणी केली आहे. मुख्यतः श्री. जयाजीराव शिंदेराव ह्यांचें स्वभाव-चित्रण दृष्टीसमोर ठेवून नाटक लिहिलें आहे.

विद्वान्मित्र मंडळी प्रा. नानासाहेब पराडकर, एम. ए., व से. नि. प्रा. बा. रा. बोकील, एम. ए., व से. नि. रा. के. कुळकर्णी, एम. ए., एल्. एल्. बी., यांनीं विशेष श्रमपूर्वक नाटक वांचून बहुमोल सूचना केल्या, त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

वरील विद्वान् मंडळींच्या सूचनांप्रमाणें शक्य तेथें सुधारणा केली आहे. श्रीमंत सरकारांच्या कृपेनेंच "शिंदेशाही पंधरा नाट्यरत्नांची माला" पूर्ण होईल अशी बळकट आशा आहे.

शेवटीं अन्नदाते श्रीमंत सरकार सर जीवाजीराव महाराजसाहेब, जी. सी. आय. ई., आलीजाह बहादुर, व अ. सौ. श्रीमंत महाराणी विजयाराजेसाहिबा ह्यांच्या कृपेनें प्रस्तुत नाट्यपुष्प अत्यंत भक्तिभावानें कै. श्री. मा. महाराणी गजराराजासाहिबा यांच्या चरणीं श्रद्धापूर्वक अर्पण करीतो उभयतां श्रीमंत रसिक असल्यानें ह्या अल्पशा नाट्यकृतीचे कोडकौतुक करतील असा आत्मविश्वास आहे. हें नाट्यपुष्प कै. श्रीमन्मातोश्रींना वाहून नम्र भावानें उभयतां सरकारांना प्रणाम करून हें हृद्गत उकलून येथें पुरें करितों.

तारीख १३ नोव्हेंबर १९४३.
संवत २००० वि०.

अखिल जनताजनार्दनाचा दास,
**रामराव सुभानराव वर्गे, एम्. ए.,**
प्रधानाध्यापक, जीवाजीराव विद्यालय, लश्कर-ग्वाल्हेर.



श्री नाट्यरूप शिंदेशाहीचे नाटककार, रामराव सुभानराव बर्गे, एम्. ए.

# प्रस्तावना

श्री. बर्गे यांचें 'मुतालकी' हें नाटक नाट्यदृष्ट्या 'मधुमीलना'पेक्षां अधिक चांगलें वठलें आहे असें माझें मत आहे. श्री. बर्गे यांच्या मनांत असलेलें राजपूत-मराठा-एकीचें व तसेंच हिंदुपद-पादशाहीचें ध्येय 'मधुमीलना'प्रमाणें या नाटकांत जेथें तेथें येत नाहीं. परंतु त्याऐवजीं अहल्याबाईचीं खंडेरावाला कंटाळवाणी होणारीं शिंदे-होळकरांनीं एक व्हावें या आशयाचीं व्याख्यानें वरचेवर येतात. नाटकाचा आरंभ याच एका व्याख्यानानें झाला असल्यामुळें पहिला प्रवेश 'मधुमीलन' किंवा 'बलिदान' यांतील प्रथम प्रवेशाप्रमाणें चटकदार न होतां कंटाळवाणा झाला आहे. वाचकांला 'प्रथम ग्रासे मक्षिका पातः' असा अनुभव येतो.

हिंदी भाषेंत झालेल्या श्री. जयशंकरप्रसाद यांच्या महाभारतकालीन 'नागयज्ञ' या नाटकापासून तों हर्षकालीन 'राज्यश्री'पर्यंतच्या नाटकांनीं नाट्यरूपानें भारतीय इतिहासाच्या उद्धाराप्रमाणें श्री. बर्गे यांचाही शिंदेशाहींतील महापुरुषांचीं मूर्तिमंत जीवनचित्रें रेखाटण्याचा हा प्रयत्न फार स्तुत्य आहे, व त्याला यश यावें ही सद्‌बुद्धि कोणाही समालोचनकारांत उत्पन्न होणें साहजिकच आहे. रा. बर्गे यांना मी नाट्यशास्त्राच्या तंत्राचा अभ्यास करा व लोकप्रिय झालेल्या नाटककारांचीं नाटकें नाटकरचना कलेच्या दृष्टीनें वाचा असें कित्येक दिवस सांगत आहे. परंतु त्यासाठीं त्यांना वेळ मिळत नाहीं व ऐतिहासिक प्रतिभा त्यांना पुढें ढकलीत आहे. त्यांनीं आपल्या 'मुतालकी'त दिलेल्या 'हृद्‌गतां'-तील पेशव्यांच्या पत्रांतील श्रीमंत राजे जयाजीअप्पांचें दोन तीन वाक्यांत दिलेलें चित्र किती तरी सुंदर, उद्‌बोधक व हृदयावर ठसा उठविणारें आहे. असा इतिहासाचा पुरावा प्रत्यक्ष डोळ्यांपुढें असतांना देखील श्री. बर्गे यांनीं आपल्या नाटकांत श्रीमंत जयाप्पांना अगदीं साधे-भोळे, राजकारणां-तील डावपेंच न खेळणारे, केवळ ध्येयवादी असें बनविलें आहे. त्यामुळें नाटकाला नायक नाहींच अशी भावना उत्पन्न होते. जयाप्पावर सद्‌भावनेनें अनुरक्त असलेली, खंडेरावांची नावडती व वेळेवर धनलोभामुळें मल्हाररावांनींही बाजूस सारलेली मुख्य नायिका अहल्याबाई होळकर जयपुरच्या महाराणीच्या सप्रेम स्वार्थत्यागापुढें फिकी पडली आहे. 'बलिदानांत' मारवाडची महाराणी श्रीमंत जयाप्पांच्या मुलांतील अद्‌भुत गुणांनीं वेडी होऊन शेतकऱ्याच्या मुलीच्या वेषानें धाडसाला प्रवृत्त होते. 'मुतालकींत' जयपुरची महाराणी शिपायाच्या वेषांत रणांगणावर जाऊन श्रीमंत जयाप्पांचे प्राण वांचविते. "मधुमीलनांत" दतियाची राजपूत राजकन्या धाडसानें संकटाचा दीर्घ प्रवास करून श्रीमंत राणोजीरावांची प्रिय राणी बनते. अशा रीतीनें राजपूत राजघराण्यांतील स्त्रिया लोह-चुंबकाकडे सुया जशा ओढल्या जातात तशा शिंदेघराण्यांतील महापुरुषांकडे गुणग्राही प्रेमपाशानें बद्ध होऊन खेंचल्या जात आहेत असें रा. बर्गे दाखवीत आहेत व सर्वसाधारण नायिकांना हें भाग्य प्राप्त होतें असेंही नाटक-कादंबऱ्यांतून वाचण्याची आपणांला संवय आहे. परंतु यालाही राजपुतान्यां-तील कडक पडद्याच्या जनरूढीचा कितपत पाठिंबा आहे अथवा ऐतिहासिक पुरावा दुबळा असून ललितकविकल्पना येथें बळावली आहे हा प्रश्न आहे.

श्री. बर्गे यांचें मल्हाररावांच्या आपमतलबी धरसोडीचें सद्‌बुद्धि व राजकारण यांच्या विरो-धाचें चित्र उत्तम वठलें आहे. तसेंच महाराणा ईश्वरसिंहजी यांच्याही मानसिक दुबळपणाचें संशयात्मक चित्र मोठ्या कुशलतेनें रेखाटलें गेलें आहे. चंद्रावतीचा कुटिलपणा व तिचे हस्तक शंकर व गणपत यांचा नीचपणाही बरा वठला आहे. माधवसिंहजीचें अमर्याद खलत्व हें श्रीमंत जयाप्पांच्या उदात्त साधुतेचें विरोधी रूप (counterfoil) आहे व तेंही चांगलें निघालें आहे.

हें नाटक दुःखपर्यवसायी आहे. खलाच्या कृष्णकारस्थानाला यश आल्यामुळें इतर हॅम्लेट, अथेल्लो या नाटकांप्रमाणें निरपराधी सज्जन माणसांचा यांत बळी पडला आहे. परंतु विनाशाला कारणीभूत विकाराचें उत्कट रूप, सृष्टिनियमाचें उल्लंघन किंवा खलाचीं दुसऱ्याला फशीं पाडणारीं कारस्थानें हीं तीन्हीहीं स्पष्ट होत नाहींत. दुःखपर्यवसायी नाटकांतील खेदजनकतेचा वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या मनावर बसणारा ताण हलका करणारें थोडें फार हास्य खंडेरावांच्या किंवा गणपत-शंकर या तिसऱ्या दर्जाच्या पात्रांतूनही निघत नाहीं. सर्वांत दुःखाची गोष्ट म्हणजे पांच माणसांचीं प्रेतें पडलेल्या व खंडेरावाच्या शराबी अधःपाताच्या भयानक दृष्यानंतर रा. बर्गे यांनीं नाटक समाप्त करावयाचें सोडून शेवटच्या प्रवेशांत त्याला आनंद पर्यवसायी करण्याची सारवासारव केली आहे. तेथें देखील मल्हारराव व पेशवे यांच्या लोभी कारस्थानानें आधींच प्रिय व्यक्तींच्या विनाशानें खिन्न झालेल्या जयाप्पांचें चहूंकडून हात बांधले गेले आहेत असें दाखविण्याच्या ऐवजीं त्यांच्या बाजूच्या सर्व मराठे सरदारांवर विषप्रयोग करणाऱ्या माधवसिंहजीला नुसत्या पायां पडण्यावरून क्षमा करण्याचा उदात्तपणा दाखविला आहे. तोच माधवसिंहजी पुढें 'रक्षाबंधन' नाटकांत जयाप्पाचा विनाश करणारी तोफ उडवतो. त्या गोळ्यानें जयाप्पांचा पाहरा संपला असल्यामुळें त्यांच्या जागीं आलेला माधवसिंहजीचा साथी खंडेराव मरतो. अशा अमानुष क्रौर्यानें भरलेल्या माधवसिंहजीला प्रांजळपणें क्षमा करण्यांत जयाप्पांच्या मुत्सद्दीपणाची हानि झालेली आहे. शूद्रकाचा चारुदत्त शकाराला क्षमा करतो. परंतु तें नाटक दुःखपर्यवसायी नाहीं व आचार्य अत्रे यांनीं आपल्या 'वसंतसेना' चित्रपटकथेंत तोच शकार आज्ञाधारक शहरकोतवाल झाल्याचें दाखवून शूद्रकाच्या चित्राची परिपूर्ति केली आहे.

या नाटकांत सर्वतोपरी घोंटाळा करून अखेर विनाश करणारा (tragic sentiment) घातक विकार म्हणजे मत्सर हा होय. जसा भवभूतीच्या उत्तररामचरितांत (एको रसः करुण एव निमित्त भेदात् भिन्नः पृथक्पृथगिवाश्रयते विवर्तान्) एकच करुण रस निरनिराळ्या पात्रांतून निरनिराळ्या रीतीनें स्फुट होतो तसाच या नाटकांत मत्सर निरनिराळीं रूपें धारण करतो. अहल्याबाईंच्या अखंड सत्य असलेल्या उच्च भावनांच्या दडपणाखालीं दबलेल्या मल्हाररावांचामुतालकीबद्दलचा गुप्त मत्सर पेशव्यांच्या पैशाच्या लोभाच्या मिषानें बिळांतील सर्पाप्रमाणें हलकेंच बाहेर पडतो. खंडेरावांत त्याच्या मनाच्या उथळपणामुळें तो आरंभापासून अखेरपर्यंत थैमान नाच करतो. माधवसिंहजीच्या जीवनाचा तर तो मूलाधारच आहे. तो महाराण्याच्या वधास कारणीभूत होतो. इतकेंच नव्हे तर पवित्र बुद्धीची महाराणी जयाप्पांच्या मांडीवर डोकें ठेवून आपलें मनोगत प्रकट करीत असतांना माधवसिंगजीकडून प्राणोत्क्रमणाचे वेळीं तिचा अपमान करवितो. जयाप्पावर जळत असलेला खंडेराव अहल्याबाईला धक्क्यांचा धाक दाखवून घालवून देववितो. दुबळ्या महाराण्याच्या मनांत तीनही महाराण्यांबद्दल व लाडक्या चंद्रावतीबद्दल संशयाला कारण होतो. चंद्रावली या मत्सरामुळेंच तीन्ही महाराण्यांवर विषप्रयोग करण्याच्या अघोर कृत्यास उद्युक्त होते. महाराण्याचे दोन्ही मंत्रीही या मत्सराच्या भूतबाधेनें ग्रस्त आहेत. अखेरीस मानवी हृदयांतील गुप्त रूपाशीं संतुष्ट न राहतां तो मत्सर कृष्णसर्पाचें भयानक स्वरूप घेऊन चंद्रावतीला यमसदनाला पाठवितो व इतकें करूनही नाटककार तृप्त न झाल्यामुळें त्या सार्पाकडून महाराण्याला व त्यांच्या रक्षणास धांवलेल्या महाराणीला दंश करवितात. टीकाकाराला मत्सराप्रमाणेंच या सर्पाचीही लीला अद्भुत वाटल्याशिवाय राहात नाहीं.

**रामकृष्ण केशव कुळकर्णी, एम्. ए., एलएल. बी.**
**माजी प्राध्यापक, व्हिक्टोरिया कॉलेज, लश्कर.**

# विद्वानांचे अभिप्राय



रा. रा. रामराव सुभानराव बर्गे, एम. ए., यांचें 'मुतालकी' नांवाचें नाटक मी समग्र वाचलें. हें नाटक शिंदे घराण्यांतील जयाजीराव शिंदे ह्या नांवाच्या एका थोर पुरुषाच्या चरित्रांतील एका सुंदर प्रसंगावर लिहिलें आहे. रा. बर्गे यांनीं शिंदे घराण्याचा इतिहास नाटचरूपानें लिहिण्याचा जो उपक्रम आरंभिला आहे तो केव्हांहि स्तुत्यच होय. इतिहास हा विषय मूलतः रुक्ष असला तरी नाटच-स्वरूपांत तो मनोरंजक होतो व त्यामुळें आपल्या पूर्वजांचें उज्ज्वल चारित्र्य व अलौकिक गुण जन-मनावर सहजपणें ठसवितां येतात. असल्या प्रकारच्या नाटकांनीं केलेलें कार्य इतिहासापेक्षां कमी मोलाचें नसतें. नाटचतंत्र सांभाळतांना ऐतिहासिक नाटकांतही क्वचित् काल्पनिक प्रसंग अथवा पात्रें यांची योजना नाटककारास करावी लागते व कांहीं ठिकाणीं तर शुद्ध ऐतिहासिकदृष्टि बाजूला सारावी लागते. पण असें करतांना त्यास मूळ ऐतिहासिक सत्यास बाध येणार नाहीं ह्या गोष्टीची खबरदारी घेणें आवश्यक असतें. प्रस्तुत नाटकाच्या बाबतींत हें धोरण पूर्णपणें अमलांत आणलें गेलें आहे. रा. बर्गे यांनीं ऐतिहासिक प्रसंगाला कलापूर्ण रीतीनें नाटचाचें रूप दिलें आहे.

जयपुर-प्रकरणाच्या बाबतींत जयाजीराव शिंदे ह्यांनीं जो अलौकिक असा राजकारणाचा डाव खेळला होता त्याचें वर्णन ह्या नाटकांत आलें आहे व ह्यामुळें आपणांस ह्या नाटकांत जयाजी-रावांच्या मुत्सद्देगिरीचें सुंदर चित्र बघावयास मिळतें. हें चित्र रंगवीत असतांना नाटककारास कांहीं ठिकाणीं कलेच्या दृष्टीनें पात्रांच्या स्वभावांत व प्रसंगांत कांहीं बदल करावा लागला आहे.

रा. बर्गे यांच्या हातून असेंच प्रयत्न वारंवार होत जाऊन त्यांचीं नाटकें अधिकाधिक चांगल्या स्वरूपाचीं निघोत असें मी इच्छितों.

ग्वाल्हेर, ता. २-९-४३. }

बाळकृष्ण रामचंद्र बोकील, एम्. ए.
माजी अध्यापक व्हिक्टोरिया कॉलेज, लश्कर.

---

संवादापेक्षां निवेदनरूपानें ऐतिहासिक घटना लोकांसमोर मांडणें सुकर असल्यानें महाकाव्यें, पोवाडे, कादंबऱ्यादि वाङमयीन अलंकारांनीं इतिहासास सजविण्याचा लेखकांनीं साधारणतः प्रयत्न केलेला दिसतो. शिंदेशाहीच्या इतिहासाला नाटचरूपी साज चढविण्यांत श्री. बर्गे यांनीं निस्संशय बरीच कल्पकता व साहस दाखविलें आहे. सर्वच ऐतिहासिक घटना नाटचतंत्रास अनुकूल नसतात व म्हणूनच पुष्कळदां नाटचरचनेस अवश्य असणारा मध्यबिंदु ऐतिहासिक नाटकांत साधणें दुर्घट होतें. अशा नाटचेतिहास कडे पाहतांना शेक्सपियरच्या ऐतिहासिक नाटकांना अनुलक्षून कॉलरिजनें दिलेला इशारा ध्यानीं न ठेवल्यास वाचकांची फसगत होण्याचा संभव असतो. कॉलरिज म्हणतो--
" The events themselves are immaterial otherwise than as the clothing and manifestation of the spirit that is working within. In this mode, the unity resulting from succession is distroyed but is supplied by a unity of a higher order, which connects the events by reference to the workers, gives a reason for them in the motives and presents men in their causative character "

श्री. बर्गे साहेबांनीं याच ध्येयानें प्रेरित होऊन नाटचरूप शिंदेशाही लिहिण्याचें काम हातीं घेतलें आहे. अशा नाटकांत व्यक्तिविषयक स्वभावधर्माच्या छटा स्पष्ट उमटल्या नाहींत असा आक्षेप कदाचित् घेण्यांत येईल. पण एवढ्या मोठ्या पटावर चितारलेल्या तसबिरींत व्यक्तिछटा पहावयाच्या नसून एकंदर व्यक्तिसमूहाचें प्रतिबिंब कसें वठलें आहे हेंच Group effect पहावयाचें असतें. हार्डीच्या Dynasts प्रमाणेंच स्थलकालाच्या व क्वचित् नाटचतंत्राचीं बंधनें झुगारून श्री. बर्गे यांनीं ऐतिहासिक पार्श्वभूमीवरच भर दिला असल्यानें मनोरंजनाबरोबरच शिंदेशाहीच्या उज्ज्वल इतिहासाची ओळखही वाचकांस सुलभतेनें होते.

ता. २-९-४३. }

ना. वा. गाडबोले, एम्. ए.,
अध्यापक व्हिक्टोरिया कॉलेज, लश्कर.

॥ श्री ॥

## नाट्यरूप शिंदेशाहीचें द्वितीय नाट्यपुष्प

# मुतालकी



### पुरुष-पात्रें

| | |
|---|---|
| श्री. राजे जयाजीराव .... .... | नायक. |
| श्री. सुभेदार मल्हारराव होळकर .... | उपनायक. |
| श्री. खंडेराव होळकर .... .... | खलपुरुषाचा मित्र. |
| श्री. महाराणा ईश्वरसिंहजी .... .... | नायकाचे मित्र. |
| श्री. महाराणा माधवसिंहजी .... .... | खलपुरुष. |
| रा. रामचंद्रबाबा.... .... .... | नायकाचे कारभारी. |
| रा. गंगाधरपंत चंद्रचूड .... .... | उपनायकाचे कारभारी. |
| रा. हरगोविंद .... .... .... | श्री. महाराणा ईश्वरसिंहजींचे प्रधान. |
| रा. विद्याधर .... .... .... | |
| शंकर महात .... .... .... | श्री. महाराणा ईश्वरसिंहजींचे हुजरे. |
| गणपत न्हावी .... .... .... | |

### स्त्री पात्रें

| | |
|---|---|
| श्री. अहिल्याबाई होळकर .... .... | श्री. खंडेरावांची पत्नी. |
| श्री. महाराणी .... .... .... | श्री. म. रा. ईश्वरसिंहजींची महाराणी. |
| चंद्रावती .... .... .... | श्री. म. रा. ईश्वरसिंहजींची नायकीण. |
| हिरा .... .... .... | श्री. अहिल्याबाईंची दासी. |
| कला .... .... .... | श्री. महाराणींची दासी. |

---



श्रीमन्त राजे जयाजीराव शिन्देराव, शिन्दे शाहीचे द्वितिय नरश्रेष्ट ; हिंदवी स्वराज्याचे उत्तरे कडील क्षेत्रिय मुतालीक.

# मुतालकी.

## अंक पहिला

### प्रवेश १ ला

(जयपूरची छावणी :—सुभेदार मल्हारराव गादीवर बसले असून पायाशीं अहिल्याबाई बसल्या आहेत व दासी हिरा उभी आहे असा देखावा).

अहिल्याबाई.—मामंजी, आपल्या वयाला, कर्तबगारीला व थोरपणाला असले विचार शोभत नाहींत. अहो जयभावोजी तरी आपलेच ना! मग त्यांच्याबद्दल एवढं नाराज कशाला व्हावयास पाहिजे? मुलांचे पराक्रम पाहून वडिलांनीं कौतुक नको का करावयाला?

सुभेदार मल्हारराव.—सुनबाई, तुम्हीं म्हणतां तें जरी खरें असलें तरी श्रीमंत राजश्री शाहू छत्रपतींनीं नको कां आमचा मान ठेवावयास? श्रीमंत नाना आहेत पोर! मग त्यांना एवढा कोठून असणार आंचपेच! राणोजीबाबा व आम्हीं, एका तोलाचे. दोघांनीं मिळून उत्तरेकडील मनसुभे आजवर पार पाडले. मराठ्यांची दौलत वाढवून जगांत तिची मोठी इभ्रत वाढविली. दुर्दैवानें आज जोडीदार हिरावून नेले! ते होते तोंपर्यंत आम्हांला कसलीही फिकीर नव्हती. पण आतां सर्व पोरवडा झाला आहे. बरें श्रीमंत राजश्रींची मर्जीही त्या नानांच्यावर! मुली, मला कांहीं सुचत नाहीं. ह्या पांढऱ्या केसांची सर्व इज्जत गेली व या पोरवड्यांत आतां काम करण्याची पाळी आली. शेवटीं फजीतवाडा होणार असें दिसतें!

अहिल्याबाई.—आपलं म्हणणं खरं आहे. राणोजीबाबा व आपण बरोबरीचे! त्याप्रमाणंच सर्व आपणांस मानतात. जयभावोजी तर आपणांस अगदीं वडिलांप्रमाणं मान देतात. मग आपण इतकं वाईट कां मानून घेतां? वडिलांनीं आतां सल्लामसलत देऊन बालकांना पराक्रम गाजविण्याची व दौलतीची सेवा करण्याची संधि देऊन उत्तेजन द्यावं उगीच मानापमानाच्या कल्पना घेऊन राजकारण बिघडविणं हें मुत्सद्यांना योग्य नव्हें.

सुभेदार मल्हारराव.—मुली, तुम्हीं म्हणतां तें खरें. पण राजकारणांत या लहानशा गोष्टी-वरच मोठीं मोठीं राजकारणें उभारलेलीं असतात. आज आमचा एवढा दरारा आहे याचें कारण, आम्हीं अगदीं बारीक सारीक राजकारणेंहीं फार बारकाईनें चोखाळतों व त्याचे निवाडे भराभर घेतों. अधिकार व दरारा यांमुळें प्रजेची श्रद्धा बसते व त्यावरूनच मोठमोठीं राजकार्यें पूर्ण करतां येतात. म्हणून आमच्या बाबतींत झालेला अन्याय लहान नाहीं. सर्व हिंदुस्थानांत आम्हांला लोक दुय्यम समजतील व प्रत्येक वेळीं आमचा अपमान करतील. आमचें मन अस्वस्थ राहील व या गोष्टीचा निकाल लावून घेईपर्यंत आम्हांला बिलकुल चैन पडणार नाहीं. एक वेळ आमचें वजन व दरारा कमी झाल्यावर सर्व आम्हांस खाण्यास उठतील. मुली, तुम्हीं ज्या पद्धतीनें विचार करतां

त्यानें आमच्या मनाचें समाधान होत नाहीं. साताऱ्याहून आल्यापासून मनाची अस्वस्थता अधिक अधिक वाढत आहे. त्यांत त्या नानांचीं पत्रें हृदयाला कशीं भाल्याप्रमाणें भोंसकीत आहेत. त्या जयाप्पांचा तोरा तर कांहीं विचारूंच नका. सर्व बाजूंनीं ह्या म्हाताऱ्या सुभेदाराची कदर घटविण्याचा सर्वांचा प्रयत्न चालू आहे. पण बाबांनों लक्षांत ठेवा हा मल्हारराव नांवाचा सुभेदार नाहीं. (खंडेराव आवेशानें प्रवेश करतो. अहिल्याबाई उठून उभ्या राहतात).

**खंडेराव.**—हा सुभेदार मल्हारकाकांचा बेटा आहे. हा असला अपमान केव्हांही सहन करणार नाहीं. त्या शिंदेराव बंधूंना आतां दोन बोटें स्वर्ग उरला आहे. काय हे अर्ध्या हळकुंडानें पिवळे झाले आहेत ? काका, आतां हें आमच्यानें नाहीं सहन करवत ! सगळी बरोबरीची सरदार मंडळी मला चिडवीत आहेत. मी आपणांस इतकें वेळां विनंति केली पण तुम्हीं त्यासाठीं कांहींच करीत नाहीं. हे शिंदेराव अधिकच शेफारून गेले आहेत. काका, राणोजीबाबांच्या पाठीमागें तुमचाच अधिकार मानला जावयास पाहिजे. आतां मुतालकी आपली व्हावयास पाहिजे व मी मुतालकीचा युवराज म्हणून मला सर्वांनीं मान दिला पाहिजे. तुम्हीं सुभेदार म्हणून कीर्ति मिळविल्यामुळें माझाही लोक सुभेदार म्हणून सन्मान करतात. पण काका, आतां तुम्हीं उत्तरेकडील सर्वाधिकारी व्हावयास पाहिजे. म्हणजे तुमच्या मागून मीही मुतालीक होऊन सर्व सरदारांना भराभर वाटेल तसे हुकूम सोडीन. त्यांनीं नाहीं ऐकलें कीं अगदीं सर्वांना शिक्षा करीन.

**सुभेदार मल्हारराव.**—खंडेराव, असले जुलमी विचार मनांतदेखील बाळगूं नको ! सेनापतीनें मोठे समजदार असावयास पाहिजे. बाबा, सर्वांचीं मनें राखूनच मोठेपणा मिळवावा लागतो.

**अहिल्याबाई.**—खरं म्हणतात मामंजी. आपणही हेंच धोरण ठेवलं तर सर्वच आपलं पुढारीपण मानतील मग शिंदेराव असोत किंवा आणखी दुसरे सरदार असोत. सर्वांना आपण वडीलकीच्या समदृष्टीनं वागवून गौरविलं तर सर्वच आपल्या तंत्रानं वागतील व सर्वाधिकारित्व स्वाभाविकपणेंच आपणाकडं येईल.

**सुभेदार मल्हारराव.**—आम्हीं पुष्कळ समजुतीनें वागूं. पण मुतालकीच्या तोऱ्यांत ते जयाप्पा वाटेल तसे वागूं लागले आहेत. मला ते मुळींच विचारीनासे झाले आहेत. नेहमीं आपलाच हुकूम मानला जावा अशी त्यांची मनीषा दिसते. राणोजीबाबा व आम्हीं किती एकोप्यानें वागत होतों, त्याची साक्ष उत्तरेकडील मराठा राजसत्तेचा प्रसारच देईल. अनेक बिकट परिस्थितींतून आम्हीं निभावून निघालों व दौलतीची वाढ केली. आतां कसे दिवस येतात कांहीं कळत नाहीं ! पेशवे तरुण, त्यांना आमची किंमत कळत नाहीं. श्रीमंत राजश्री पोक्त व विचारी असून त्यांनींही हक्काचा विचार केला नाहीं. ही मुतालकी वंशपरंपरा करण्याचा त्यांचा विचार दिसतो. किती अन्याय आहे हा ! मुलांनों, माझ्या या कसलेल्या पीळदार हाडांत मुतालकी संभाळण्याची कुवत नाहीं असें कां राजश्रींना वाटलें ? बरं मी म्हटलें, मी म्हातारा आहे मला सोडा. पण माझा खंडेराव आहे त्याला तरी तो अधिकार द्या. पण नानांनीं असें नाक मुरडलें कीं कांहीं विचारूं नका. मुली, तूंच सांग, खंडेराव का जयाप्पांच्यापेक्षां कमी लायक आहे ? पण, नाहीं. नाना त्यांचे पक्षपाती व राजश्री नानांचे पक्षपाती. मग या म्हाताऱ्याच्या शद्बाकडे कोण लक्ष देतो !

**अहिल्याबाई.**—मामंजी, एकदां मनानं संशयाचं वातावरण निर्माण केलं कीं प्रत्येक गोष्टींत आपणांस कांहींना कांहीं आढळून येतंच. श्रीछत्रपतींनीं कुठल्याही जागा वंशपरंपरा ठेवूं नयेत, असं माझं मत आहे. पण जयभावोजी कांहीं कमी पराक्रमी नाहींत ! राणोजीबाबांपेक्षांही त्यांची धडाडी मोठी आहे. सरदारकीचं सिंहासन प्राप्त होण्याच्या अगोदरपासून ते अर्जुनाप्रमाणं पराक्रमी, अशी

त्यांची खात्री झालेली आहे. त्यांची धडाडी किती मोठी आहे पहा ! हां हां म्हणतां त्यांनीं माळव्यांतील सर्व बखेडे मोडले व बुंदेलखंडांतील मराठ्यांची सत्ता बळकट केली. ह्यावरून सर्वाधिकारीपणाला ते लायक आहेत हें सिद्ध नाहीं कां होत !

खंडेराव.—हो, हो, सिद्ध होत आहे ! मोठी स्तुति करून राहिली आहेस ! जसा काय तोच पराक्रमी व आम्हीं अगदीं बांगड्या भरल्या आहेत ! तूं इतकी त्यांची बाजू कां घेतेस ? काका किंवा मी मुतालीक होऊं नये असेंच वाटतें ना तुला ?

अहिल्याबाई.—असं अगदीं रागावूं नका. घरांत कोणाला अधिकार मिळाले तर आम्हांला आनंद होईल कां वाईट वाटेल ? आपणच विचार करा. पण समजा दौलतीच्या अधिकाऱ्यांनीं परिस्थिति पाहून त्यांना सोइस्कर अशी निवड केली, तर बाकी सर्वांनीं तो हुकूम पाळला पाहिजे. शिस्त मोडतां उपयोगी नाहीं. स्वामी ते स्वामी. त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानली पाहिजे. उगीच वितंडवाद करून आपसांत तेढ वाढविणं मुळींच योग्य नाहीं. आपसांत कलह माजला तर तिसरे टपून बसले आहेतच. सर्वांचा नाश आत्तां करून टाकतील. म्हणून मराठ्यांनीं अगदीं सदैव एकजुटीनं राहिलं पाहिजे, तरच ह्या दूरच्या परक्या प्रदेशांत त्यांचा टिकाव लागणार आहे.

सुभेदार मल्हारराव.—मुली, ह्या सर्व परिस्थितीची मला कल्पना आहे. पण मी म्हणतों आम्हींही आमचें कल्याण करून घेतलें पाहिजे. श्री छत्रपति राहणार साताऱ्यास ! तेथून ते हुकूम सोडणार ! हिंदवी स्वराज्याचें सुंदर ध्येय पुढें ठेवून त्याला अनुसरून सर्व दिशेचें कामकाज ते उरकणार. मोठमोठे व्याप हातीं घेतल्यानें ते नेहमीं कर्जबाजारी असतात. दौलतीचें कर्ज फेडावें असे सारखे तगादे येणार. पण ते असा विचार करीत नाहींत कीं आम्हांला इथें फौजा ठेवाव्या लागतात व अनेक प्रसंगांशीं झगडावें लागतें. नेहमींच आम्हीं सरदार म्हणून नुसते फौजी राहून कसें चालणार ? इकडील मुलुखाची व्यवस्था करावयाची म्हणजे सर्व प्रकारचीं खातीं निर्माण करावयास पाहिजेत तरच राज्यकारभार सुरळीत चालेल. म्हणून आम्हीं येथील आमचीं राज्यें चालवावीं कीं छत्रपतींचीं कर्जें फेडीत बसावें ? तसेच पेशवे राजश्रींजवळ राहतात व श्रीमंत म्हणून तोरा मिरवितात. त्यांचीही राजकारणांतील लुडबुड आम्हांला नेहमीं जाचक होत आहे. कष्ट करावे आम्हीं, जीव धोक्यांत घालावे आम्हीं; पैसा, माणसें वगैरे बाबतींत नुकसान सोसावें आम्हीं, आणि त्या राजश्रींनीं व श्रीमंतांनीं आम्हांला पैशाकरितां सारखें तंग करावें, या धोरणाला आपण तर अगदीं कंटाळलों आहे.

अहिल्याबाई.—असा आपण छत्रपतींना दोष देऊं नका. त्यांचं मन गंगेसारखं निर्मळ व शुद्ध आहे. ते सर्व करतात ते हिंदवी स्वराज्याकरितांच करत आहेत. त्यांच्या राजकारणांत विपरीत भाव नाहीं. थोरल्या आबासाहेबांनीं जी प्रथा घालून दिली, जें ध्येय पुढं ठेविलं त्याला अनुसरूनच राजश्री वागत आहेत. आतां राहिले श्रीमंत. तेही हिंदुपदपातशाहीच्या कल्पनेला अनुकूल असून छत्रपतींचे मनसुबे चालवीत आहेत. सर्व व्याप हिंदुपदपातशाहीकरितांच आहे. शिंदे-होळकर हे ह्या पातशाहीचे दोन मुख्य आधारस्तंभ आहेत. ते नेहमीं संतुष्ट, एकविचारी, सावधान, पराक्रमशाली व वैभवशाली राहिले पाहिजेत. स्वामीभक्ति ही त्यांच्या ठिकाणीं अणुभरही कमी होतां कामा नये. तरच हें उत्तरेकडलं स्वराज्याचं तारूं तरून जाऊन विजय संपादिला जाईल. शिंदे-होळकरांत बेदिली झाली कीं सर्वच आटोपलं. मग मात्र सर्वनाश टाळतां येणार नाहीं. मामंजी, या गोष्टींचा विचार करा. आपल्या अंगांत थोडं स्वार्थाचं वारं खेळूं लागलं आहे, तें अजीबात काढून टाका. शिंदेरावांबद्दल जे मत्सर डोकावूं पहात आहेत त्यांचं काळं तोंड करून त्यांना हांकून द्या.

मामंजी, मराठ्यांची धनदौलत, नव्हे सौभाग्यलक्ष्मी सांभाळावयाची असेल तर वेळींच सावध व्हा व स्वार्थ व मत्सर ह्यांना फांटा देऊन शुद्ध मनानं येणारीं राजकारणं उलगडा. आपण थोर आहांत, शूर आहांत, अनुभवी आहांत. मी अबलेनं, आपल्या सुनेनं वडिलांस अधिक काय सांगावं? पुरुषाला वेळींच सावध करणं आमचा धर्म आहे. नाथ, आपणही शांत रहा. लोकांच्या चिथावणीनं चिडून जाऊं नका!

**खंडेराव**.—हो, हो, माहीत आहे सर्व शास्त्र. स्वतःच्या मनगटांत बळ असतां दुसऱ्याच्या हुकमतीखालीं राहणें कितपत न्याय्य आहे? काकांचा हक्क असतां तो पायाखालीं तुडविला जात आहे, हें मला कसं पाहवेल? मुतालकीच्या जागेला त्यांची लायकी नाहीं, माझी लायकी नाहीं, पिलाजी जाधवरावांची नाहीं, यशवंतराव पवारांची नाहीं. फक्त शिंदेरावांचीच आहे! खासा न्याय! तुम्हीं म्हणतां आम्हीं शांत रहावें, कां? तर मराठ्यांच्या सौभाग्यलक्ष्मीकरितां पण आमच्या मानापमानाची कोणाला तरी फिकीर आहे कां? राजश्रींनीं किंवा श्रीमंतांनीं वाटेल ती आज्ञा केली म्हणून ती मानण्यास काका कांहीं बांधले नाहींत. काका श्रेष्ठ कीं हे दोन दिवसांचे श्रीमंत श्रेष्ठ? काका, तें कांहीं नाहीं. तुम्हीं आपले मुतालकीचे अधिकार ठासून प्रस्थापित करा. मग ते नानासाहेब व हे अप्पासाहेब काय करतात तें पाहूं. निदान मी तरी त्या नानासाहेबांच्या हुकुमाची पर्वा करणार नाहीं. मग या अप्पांना कोण भीक घालतो?

**सुभेदार मल्हारराव**.—खंडेराव, सर्व गोष्टी थोडच्या शांतपणें व विचाराविचारानेंच पार पाडूं. अहिल्या म्हणते तें खरें आहे. आपण आपसांत भांडूं लागलों तर आमचे शत्रु तेव्हांच आमचा नाश करतील. म्हणून कलह न दाखवितां मुतालकीचे सर्व अधिकार आपणांकडे हळुहळू घेतां येतील. तूं आतां कोणापाशीं बडबड करूं नको. कोणी चिडविलें तरी चिडून जाऊं नको. शांत व सावध राहून सर्व कामें करीत राहूं. एक दिवस असा उजाडेल कीं त्या दिवशीं हा मल्हारराव किंवा त्याचा पुत्र खंडेराव हा उत्तरेकडील सर्वाधिकारी होईल. बाळ अहिल्या, तुमच्या सल्ल्याप्रमाणें आम्हीं सर्व गोष्टी सावधगिरीनें व सफाईनें उलगडूं. जितकी तुम्हांला मराठा दौलतीची फिकीर आहे, त्याहून आम्हांस ती अधिक आहे. खंडेराव, मुलगी फार शहाणी, धार्मिक व नीतिमान् आहे. तूं मोठा भाग्यवान् आहेस. बाबा, अशा पत्नीच्या सल्ल्यानें वागल्यास तुझें फार कल्याण होऊन तूं मोठा वैभवशाली होशील. मात्र तुझा रागीट स्वभाव व उतावळेपणा तूं सोडून दे. खरं कीं नाहीं अहिल्या?

**अहिल्याबाई**.—मी कांहीं म्हणेन तर आत्तां माझ्या अंगावर धांवून येतील! आमची बायकांची बुद्धी! मानणं न मानणं पुरुषाचं काम. आम्हीं मात्र आम्हांला जें वाटतं तें बोलल्यावांचून रहाणार नाहीं. मग तें कोणाला बरं वाटो कीं कडू वाटो. स्वार्थानं व मत्सरानं आजवर कोणाचंही भलं झालेलं नाहीं. म्हणून दोघांना ही विनंति केली कीं ही दुही सोडून द्या आणि दिलदार मनानं व सरळ वागणुकीनं मराठी दुनियेचं भलं करा.

**खंडेराव**.—ऐका काका, कसें पांडित्य चाललें आहे! तुम्हीं लाडानं हिला फार बोलकी करून ठेवली आहे. काय शहाणपणाच्या गोष्टी चालल्या आहेत पहा! तुझ्या वयाला तरी त्या शोभतात कां? तुला काका फार मान देतात व प्रेमानें वागवितात म्हणून तूं आतां डोक्यावर बसूं लागली आहेस.

**अहिल्याबाई**.—पाहिलंत मामंजी, असं हे वर्दळीवर घटकोघटकीं यावयाचं! कांहीं सांगितलं तर तें पटायचं नाहीं. समजूत घालावयाला गेलं तर हट्टानं आणखी भलत्याच गोष्टी करायच्या. असं हें आपलं नेहमीं चाललेलं असतं. आपणांपासून चार अक्षरं शिकलें व नेहमीं संगतींत राहून अनेक

राजकारणं पाहिलीं त्यामुळं थोडसं ज्ञान झालं. म्हणून माणूस कधीं तरी बोलतं. पण तेंही ह्यांना आवडत नाहीं. मामंजी मी कुठं चुकत असेन तर सांगा, म्हणजे मी तशी वागेन.

**सुभेदार मल्हारराव.**—मुली, तूं फार शाहाणी आहेस. असेंच शहाणपण वाढविलें पाहिजे. ज्यांना मोठीं मोठीं राज्यें हांकावयाची आहेत, त्यांच्या घरच्या लक्ष्मीही फार तरबेज असावयास पाहिजेत. राज्यें चालविणें कांहीं सोपें नाहीं. तुझा आपला राजकारणाचा अभ्यास चालूं राहूं दे. खंडेराव, उगीच वर्दळीवर येत जाऊं नकोस. मीच तिला राजकारणांत वाकबगार बनवीत आहे. माझ्या मागें ह्या इंदूरच्या लक्ष्मीची कीर्ति दिगंत दरवळली पाहिजे. तूं तर माझा पुत्रच आहेस. तूं कसाही तयार होशील. टक्केटोणपे खाऊन पुरुष तयार होऊं शकतो, पण बायकोमाणसाची फार कुचंबणा होते. राणी हुषार नसेल तर कारभाऱ्याचें फावतें व राज्याचा नाश हां हां म्हणतां होतो. खंडेराव माझ्या आहिल्येला नेहमीं उत्तेजित करीत जा. तिच्याशीं मुळींच वर्दळीवर येत जाऊं नकोस. घरच्या देवींना नेहमीं संतुष्ट ठेवून त्यांना नेहमीं मनसुबे समजावून देत जावें. आजवर आर्य स्त्रियांनीं जी कीर्ति मिळविली आहे ती असामान्य आहे. अनेक सती निर्माण होऊन ह्या भरतखंडाची कीर्ति त्यांनीं अजरामर केली आहे. तशीच माझी ही अहिल्या मोठी धार्मिक, राजकारणी, दयाशील, न्यायी, वगैरे अनेक गुणांनीं अलंकृत होईल.

**खंडेराव.**—काका, अशा स्तुतीनेंच ही मला जुमानिनाशी झाली आहे. जेव्हां तेव्हां आपली वेदांत सांगूं लागते. मी पति आहे हें सुद्धां ती विसरून जाते व मो चा शिष्ठाईच्या गोष्टी सांगून माझ्यावर मात करूं पहाते.

**सुभेदार मल्हारराव.**—खंडेराव, तुला बिलकुल समजत नाहीं. अरे, अशी सर्वगुणसंपन्न पत्नी मिळाली म्हणून तूं धन्यता मानिली पाहिजेस. अशीं स्त्री-रत्नें खरोखरच दुनियेंत दुर्मिळ असतात. हं, बाळानों, तुम्हां दोघांनाही सांगतों कीं तुम्हीं वर्दळीवर न येतां नेहमीं समजूतीनें वागा. सर्व मदार तुम्हां दोघांवर आहे. तुम्हीं चांगले निघालात, चांगला लौकिक मिळविलात म्हणजे या म्हाताऱ्याचे डोळे निवतील व आयुष्याचें चीज झालें म्हणून मला समाधान वाटेल. अहिल्याबाई, माझ्या खंडे-रावाला तूं नीट सांभाळ. तो शिपाईगडी आहे, मुत्सद्दी नाहीं. त्याचें शौर्य व तुझी सल्ला हीं दोन्हीं जर बरोबरीनें कार्य करतील. तर होळकरशाहीचें नांव जगांत गाजेल. माझा सर्व भरंवसा तुम्हां लेंकरांवर आहे.

**अहिल्याबाई.**—मामंजी, यांनीं कांहीं केलं तरी मी त्यांच्यावर रागावणार नाहीं. तुमचा शद्ब मी केव्हांही मोडणार नाहीं. मी कधीं तरी वावगं सांगतें कां? विचारा त्यांना. माझे आपले विचार नेहमीं सात्त्विक असतात. हे कधीं राजस तर कधीं तामस वृत्तींत असतात. त्यामुळं असा विरोध भासतो. माणसाचं हित सात्विक विचारांनींच होतं. तामसी किंवा राजस विचारांनीं तितकं होत नाहीं.

**सुभेदार मल्हारराव.**—बाई, तुझे सात्त्विक विचार व आचार याबद्दल आम्हांला नेहमीं कौतुक वाटतें. पण राजनीति थोडी वेगळी आहे. तीही जरा चांगली अवगत करून घेतली पाहिजे. तुम्हीं दोघेही राजनीतींत अगदीं नवशिके आहांत. म्हणून मला नेहमीं वाटतें कीं तुम्हीं लवकर राजनीतिप्रवीण व्हावें.

**अहिल्याबाई.**—आपल्या आशीर्वादानं सर्वकांहीं ठीक होईल. पहाऱ्यावर कोणी तरी बोलत आहे. दासी, पहा कोण आहे तें! खासे असतील तर त्यांना तसेच घेऊन ये, जा.

**दासी.**—जी सरकार (दासी जाते).

**सुभेदार मल्हारराव.**—या वेळीं भेटावयास कोण येत असावें ? भलतीच वेळ आहे ही ! मुलांनों थोडें सावध असा हं. कारण आपण शत्रूंच्या मुलुखांत आहों. कदाचित् दगा होण्याची भीति आहे. आपआपलीं हत्यारें जवळ ठेवा व हुशारीनें असा. पहाऱ्यावर शिलेदार असतीलच !

**खंडेराव.**—ऐवढें भिण्याचें कारण नाहीं. छावणींत चोहोंकडे कडेकोट बंदोबस्त आहे. इथें शत्रूचा शिरकाव होणें शक्य नाहीं. खाशा स्वाऱ्यांपैकींच कोणीतरी काकांना भेटावयास आले असतील. जैतपूरचें प्रकरण आतां शेवटास आलेंच आहे. फक्त तहावर सह्या व्हावयाच्या राहिल्या आहेत. म्हणून एवढें काळजीचें कारण नाहीं शिवाय शिलेदार पहाऱ्यावर आहेतच ! (दासी पुढें व मागून राजे जयाजीराव व हरगोविंद येतात. अप्पांना पाहून खंडेराव तोंड फिरवितात. अहिल्याबाई आनंदित होतात).

**राजे जयाजीराव**—काका, ह्या बालकाचा नमस्कार घ्या. हरगोविंद काका साहेबांस मुजरा करा. (हरगोविंद मुजरा करतो) वहिनी, भैया, नमस्कार.

**सुभेदार मल्हारराव.**—अप्पा या बाळ. दीर्घायुषी व्हा. या, माझ्याजवळ बसा (राजे जयाजी-राव जवळ जाऊन बसतात).

**राजे जयाजीराव.**—भैय्या, या ना माझ्याजवळ. (खंडेराव जाऊन बसतात). हं, वहिनी बऱ्या तर आहांत ना ? आपण आंत जा व न्याहारीला कांहीं तरी गोड गोड बनवायला सांगा. आज आपण न्याहारी केल्याशिवाय जाणार नाहीं.

**अहिल्याबाई.**—(आनंदानें) मीही माझ्या भावोजींना न्याहारी केल्यावांचून थोडीच जाऊं देणार आहे ! मी आतां सर्व तयारी करवितें. तसंच परत जावयाचं नाहीं बरं कां ? दासी, मुदपाकांत जाऊन सर्व तयारी करण्यास सांग. आज चांगलीं गोड गोड पक्वान्नें तयार करा म्हणावं ! खाशा स्वाऱ्या आल्या आहेत ! मामंजी, बोलणीं लवकर संपवून लवकरच या हं !

**सुभेदार मल्हारराव.**—आतां अप्पा फराळास येणार, मग त्यांची वहिनी कशी हयगय करील ? आम्हींही बोलणीं संपवून लवकरच येतों.

**अहिल्याबाई.**—दासी, चल. (सर्वांना नमस्कार करतात व जाऊं लागतात).

**दासी.**—चलावं सरकार. (जातात).

**सुभेदार मल्हारराव.**—हं, अप्पा बोला बाबा काय प्रकरणें आणलीं आहेत ? हे गृहस्थ कोण ?

**राजे जयाजीराव.**—काका, जयपूरचे महाराणा ईश्वरसिंहजी यांचे हे वकील आहेत. हरगोविंदजी, असे इकडे या व काकांच्याजवळ बसा. हा कांहीं दरबार नाहीं. खाजगी बैठक आहे. मोकळ्या मनानें बसा व आपलें काय म्हणणें आहे ते काकांना सविस्तर सांगा. म्हणजे ते आपलें मत देतील त्याप्रमाणें आम्हांला वागावयास बरें पडेल. (हरगोविंद जाऊन बसतो).

**हरगोविंद.**—सरकार, महाराणा सवाई जयसिंहजी निवर्तल्यास आज तीन वर्षें होऊन गेलीं. त्यांच्या जागीं ईश्वरसिंहजी, त्यांचे वडील चिरंजीव, महाराणा झाले आहेत. माधवसिंहजी हे त्यांचे धाकटे बंधू; पण मेवाडच्या राणीपासून झाले म्हणून त्यांचा हक्क पहिला या समजुतीनें गादी-बद्दल तंटे लागतील; म्हणून कैलासवासी महाराण्यांनीं एक प्रांत देववून त्यांना मेवाडमध्येंच ठेवलें होतें. तो रामपुरा प्रांत जहागीर म्हणून वापरावा व मेवाडच्या महाराण्यांची त्यांनीं चाकरी करावी असें ठरलें होतें. आतां मेवाडचे राणे जगतसिहजी यांनीं माधवसिंहजींना पुढें करून जयपुरच्या गादी-संबंधीं तंटे निर्माण केले आहेत. त्या बाबतींत महाराणा ईश्वरसिंहजींनीं मला आपणांकडे पाठविलें

आहे. च्छा ही कीं आपला आमचा स्नेह फार जुना आहे म्हणून अशा संकटाच्या वेळीं आपण महाराण्यांना मदत करावी.

**सुभेदार मल्हारराव.**—अस्सं, एकूण जयपूरप्रकरण निर्माण झालें आहे म्हणावयाचें ! बरें महाराण्यांनीं आपणांस कोणाकडे पाठविलें ?

**हरगोविंद.**—महाराण्यांनीं सांगितलें कीं राजे राणोजीराव शिंदे व आपले पूज्य वडील महाराणाजी ह्यांचा जीवश्च-कंठश्च स्नेह होता. हिंदुपदपातशाही स्थापन करण्याकरितां त्यांनीं मराठाराजपूत ऐक्य घडवून आणलें होतें. ते एकमेकांस पगडभाई समजत होते. बादशाहींत त्यांनीं उभयतांनीं अनेक मनसुबे घडवून आणले व हिंदवी स्वराज्याचें कार्य सोपें केलें. दुर्दैवानें आतां दोघेही राहिले नाहींत. तरी पण त्यांचे वडील चिरंजीव राजे जयाजीराव शिंदेराव दौलतीची सेवा करीत आहेत. त्यांना माझी ही गजेंद्राची हांक तूं ऐकीव म्हणजे ते धांवून येतील व माझें संकट दूर करतील.

**सुभेदार मल्हारराव.**—(एकीकडे) एकूण महाराण्यांना अप्पांचीच आठवण आली ? या म्हाताऱ्या मल्हाररावाची झाली नाहीं ? हो आतां म्हाताऱ्याचें काय काम ? शिवाय अप्पा पडले मुतालीक तेव्हां राणाजींनीं तुम्हांला त्यांना भेटावयाला सांगितलें हें योग्यच. (उघड) हं जयाप्पा, मराठ्यांचे मुतालीक, मराठ्यांचे सर्वाधिकारी, काय सांगतां राणाजींना ?

**खंडेराव.**—हं ! पराक्रमी, वीरशिरोमणी, काय देतां निरोप राणाजींना? काकांची व या खंडेरावाची महाराण्यांना काय कदर ? तुम्हीं आहांतच सर्व मनसुबे तडीस नेणारे !

**राजे जयाजीराव.**—काका, दादा, आश्चर्य आहे ह्या तुमच्या विरोधी बोलण्याचें ! तुम्हीं दोघेंही मला असें कां हिणवितां हें कांहीं कळत नाहीं ! मी जर मुतालीक किंवा सर्वाधिकारी या तोऱ्यांत असतों तर ह्या वकीलांना घेऊन इकडे आलोंच नसतों. तिथेंच होय किंवा नाहीं असा जबाब दिला असता. मी आपणास वडीलकीच्या नात्यानें प्रत्येक गोष्ट विचारतों. आपल्या सल्लयाच्या केव्हांही बाहेर जात नाहीं. मग तुम्हीं माझ्याशीं अलीकडे नाराज कां असावें, हेंच कळत नाहीं. मी श्रीमंत राजश्रींना किंवा नानांना मुतालकी मागितली नाहीं. त्यांनींहून ती माझ्या गळ्यांत टाकली. त्याबद्दल आपणांस विषाद वाटतो कां ? तो अधिकार तुमच्यापैकीं कोणास पाहिजे असेल तर मी आनंदानें तो तुम्हांस द्यावा असें श्रीमंत छत्रपतींना व नानांना लिहितों ! ते दोघेही माझें ऐकतील. मात्र तुमची इच्छा मला कळवा.

**सुभेदार मल्हारराव.**—जयाप्पा, छत्रपतींनीं व पेशव्यांनीं माझ्या बाबतींत एवढा अन्याय केला आहे कीं तो कशानेंही भरून निघणार नाहीं. हिंदुस्थानांतील सर्व राजे रजवाड्यांत त्यांनीं आम्हांस खालीं पहावयास लाविलें आहे. आमच्या सारख्यास करपटाप्रमाणें लेखून तुझ्या सारख्या पोराच्या गळ्यांत ते अधिकार टाकले, ही केवढी मोठी चूक त्यांनीं केली बरं ? नानांला मी नको होतों तर माझा खंडेराव तरी होता कीं नाहीं ? त्याला बनवावयाचें होतें सर्वाधिकारी !

**राजे जयाजीराव.**—बरं काका, त्यांनीं चूक केली ती मी भरून काढतों. आजपासून मी स्वतः माझे अधिकार तुम्हांस देतों. पाहिजे तर लिहून द्या. तिकडे साताऱ्यासही मी याप्रमाणें कळवितों. तुम्हीं पुढाकार घेऊन यापुढें सर्व गोष्टी उलगडीत चला. मी तुमची आज्ञा मानणारा एक सेनापति होतों. हं, बोला आहे तयारी ? आजपासूनच आपण ते अधिकार गाजवूं लागा. हं, बोला आतां या जयपूरप्रकरणाचें कसें काय ठरवावयाचें ? भैय्या, तुम्हांला आहे का ही योजना पसंत ? दोघेही अगदीं मोकळ्या मनानें सांगा. तिऱ्हाईतापुढें अब्रू जातां कामा नये. आमच्यांत कलह आहे असें नसतें

भासणें म्हणजे भयंकर घात आहे. बोला, अगदीं मोकळया मनानें बोला. तुमचा मजवर कांहीं रुसवा नाहीं ना ?

खंडेराव.—काकांना मुतालकी मिळाल्यावर आमचा कांहीं रुसवा नाहीं.

सुभेदार मल्हारराव.—अप्पा, शाबास तुझ्या थोर मनाची ! खंडेराव, पुत्र असावा तर असा असावा. किती त्यागवृत्ति जयाप्पांच्या अंगांत खेळत आहे ! तूं मात्र तुझें हलकें मन दाखविलेंस ! अप्पा, तुझें करणें मला पसंत आहे. तुला अनुभव मिळेपर्यंत तूं मला सल्ला विचारावी व नंतर कोणत्याही गोष्टींत हात घालावा. सर्व अधिकार तुजकडेच राहतील ! मात्र एकही गोष्ट मला विचारल्यावांचून करूं नये. त्या पेशव्यांशीं संबंध जरा बेताचाच ठेवावा. उत्तरेकडे सत्ता आपली चालली पाहिजे हें ध्यानांत ठेव. खंडेराव, तूं खराच बावळा व उतावळा आहेस. शीक कांहींतरी राजकारण ! नुसता शिपाईगडीच राहूं नकोस.

खंडेराव.—काका, तुम्हींही अप्पांच्या मायावी बोलण्यानें फसलांत म्हणावयाचें ! अहो, अधिकार घेऊन तर पहा, मग जीव कसा खालवर होईल त्यांचा.

राजे जयाजीराव.—भैय्या, तुला थट्टा वाटते होय माझ्या बोलण्याची ? आतां कशाला, वेळ येऊं दे, मग आम्हीं दाखवितों आमची त्यागवृत्ति. आतां तुला आमचें बोलणें मायावी वाटत आहे, वाटो बिचारें ! हं मुख्य विषयाबद्दल काय ठरवावयाचें ?

सुभेदार मल्हारराव.—जयाप्पा, महाराणा सवाई जयसिंहजी व मराठे यांचा लोभ फार मोठा होता, म्हणून जयपूरची व्यवस्था नीट लावून देणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे. आतां तुमचे पेशवेच काय करतात हें पहावें लागेल. माझ्यामतें महाराणा ईश्वरसिंहजीस आपली पूर्ण मदत मिळावयास पाहिजे.

राजे जयाजीराव.—काका, आपली सल्ला मलाही पसंत आहे. ईश्वरसिंहजी आमचे पगडबंधूच लागतात. तेव्हां त्यांना साहाय्य करण्यास आम्हीं बांधले आहों. बरं, रामचंद्रबाबांना सांगून श्रीमंत छत्रपतींची व नानांची संमति आपल्या कार्यास मिळवितों. एकंदर हें निश्चित ठरलें कीं जयपूर-प्रकरणांत हात घालावयाचा. कां ? आणखी कांहीं दुसरा विचार आहे ?

सुभेदार मल्हारराव.—हें पहा, मदत आपण करूं पण सर्वांना नजराणे भरपूर द्यावे लागतील. काय वकीलसाहेब आहे कां आपली तयारी ? छत्रपतींचा नजराणा वेगळा, पेशव्यांचा वेगळा व आमच्या अप्पांचा वेगळा !

खंडेराव.—त्याचप्रमाणें वकीलसाहेब काकांचा व माझाही पण वेगळा. पुरते सर्व नजराणे चुकते घेतल्यावाचून आम्हीं नाहीं हात घालणार. बोला किती किती नजराणे द्याल ?

हरगोविंद.—एवढें मोठे संकट आलें आहे, कीं तुम्हीं ठरवाल ते नजराणे आम्हांस कबूल आहेत. आमच्या शत्रूची तयारी जबरदस्त आहे. म्हणून आम्हांलाही तशाच तयारीनें उभें राहिलें पाहिजे. सांगाल ते नजराणे मंजूर ! बोला मदत पक्की झाली ? आतां कांहीं फेरबदल नाहीं ना होणार ?

खंडेराव.—(एकीकडे) काका, वचनांत गुंतूं नका हं. कदाचित दुसऱ्या बाजूनें अधिक रकमा मिळतील. नुसतें आपलें गोलमोल ठेवा.

सुभेदार मल्हारराव.—(हळूंच) चुप बैस, भलतंच कांहीं बोलूं नकोस. (मोठ्यानें) वकील-साहेब, जरा दुसऱ्या बाजूची तयारी तर आम्हांला कळूं द्या! म्हणजे आणखी विचार करण्यास बरें पडेल !

**राजे जयाजीराव.**—खरंच वकीलसाहेब जरा सविस्तर सांगा.

**हरगोविंद.**—सरकार, मुख्य गोष्ट ही आहे कीं, माधवसिंहजीस मेवाडचे राणाजी जगतसिंहजी ह्यांची पूर्ण मदत आहे. त्यांनीं आपलीं सर्व सैन्यें एकत्र करून जयपूरवर येण्याचा घाट घातला आहे. शिवाय दिल्लीपतींना एक कोट रुपये देण्याचें मेवाडचे महाराण्यांनीं कबूल केलें आहे. त्यानें माधवसिंहास जयपूरचे महाराणा म्हणून फक्त मान्यता द्यावी. जमल्यास वजीर वगैरे लोकांचे साहाय्य मिळवून बादशाही सैन्यही जयपुरावर घालण्याचा मेवाडाधिपतींचा बेत आहे. ह्या सर्व गोष्टींनीं भिऊन जाऊन महाराणा ईश्वरसिंहांनीं आपल्या मदतीची याचना केली आहे. या वेळीं आम्हीं द्रव्याकडे पाहणार नाहीं. मात्र तुम्हीं आमचें संकट निवारण केलें पाहिजे. तुमच्या शिवाय आतां आम्हांला कोणीही आधार नाहीं.

**राजे जयाजीराव.**—आम्हांला जरी पैशाची आवश्यकता आहे, कारण राष्ट्रकार्यांत त्याची नेहमींच आवश्यकता असते, तरी आम्हीं त्याकरितां राणाजींना आडवणार नाहीं. आमच्या वडिलांना त्यांची फार मोठी मदत झाली आहे. तिची परतफेड करण्याची ही सुवर्णसंधि आलेली आहे, म्हणून ती आम्हांस दवडतां येणार नाहीं.

**खंडेराव.**—अप्पा, पैशाच्या बाबतींत चोख असलें पाहिजे बाबा ! पहिले रकमा ठरवून ध्या, नंतर ह्या प्रकरणांत हात घाला.

**सुभेदार मल्हारराव.**—होय, खंडेराव म्हणतो तें खरें आहे. पहिले करारमदार ठरवा, मग पुढें मदतीची भाषा. पैशाशिवाय फौजा तगवायच्या कशा ? त्यांच्या सर्व गोष्टींची तरतूद पहिले करावयास पाहिजे. पैसा नसेल तर एवढया फौजा बाळगावयाच्या कशा ? युद्धसामुग्री, दाणागोटा, जनावरें खाणेंपिणें, कपडालत्ता, इत्यादि गोष्टी पैशाशिवाय यावयाच्या कोठून ? म्हणून प्रथमच स्पष्ट असावयास पाहिजे. बोला, वकीलसाहेब आम्हीं म्हणतों तें खरें कीं खोटें ?

**हरगोविंद.**—सुभेदारसाहेब, आपण म्हणतां तें वाजवी आहे. जयपूरला जी आपली फौज आमच्या मदतीस येईल तिचा सर्व खर्च ती तिकडे असेपर्यंत आम्हीं उचलूं, शिवाय जे नजराणे आपण सांगाल ते आम्हीं देऊं. हेंच आमचें वचन.

**राजे जयाजीराव.**—होय, आम्हांला आपलें बोलणें पसंत आहे. काका, भैय्या, आतां आपण तयारी करा. वकीलांबरोबर लागलीच आपल्या फौजा उद्यांच जयपुराकडे कूच करतील. आतां आम्हीं कोणीही मागें पुढें पाहणार नाहीं. भैय्या, एखाद्या शिलेदारास बरोबर देऊन आमच्या डेऱ्यांत वकीलसाहेबांना पोहोंचवा. त्यांची भोजनाची सोय तिकडेच करण्याची व्यवस्था केली आहे. तोंपर्यंत आम्हीं तिकडे येतोंच. तुम्हीं लवकर वकीलसाहेबांस रवाना करून परत जा. आज वहिनींकडे सर्व मिळूनच फराळ करूं. माझ्या मतें आजचा मनसुबा वहिनींना खात्रीनें पसंत पडेल !

**खंडेराव.**—(एकीकडे) गाजवूं लागला बरं हा सर्वाधिकार ! (उघड) चला वकीलसाहेब, अप्पांच्या छावणीकडे तुम्हांस पोहोंचवितों. (दोघे जातात).

**सुभेदार मल्हारराव.**—जयाप्पा, मोठी कामगिरी गळयांत घेतली आहे आपण ! ती तडीला नेणें फार फार बिकट आहे. विरुद्ध बाजूला प्रत्यक्ष बादशहा, वजीर, मेवाडचा महाराणा शिवाय महाराण्याचे मित्र राजपूत राजेरजवाडे असणार ! म्हणून कामगिरी फार जबरदस्त आहे. मला तरी मोठी काळजी वाटते !

**राजे जयाजीराव.**—मल्हारकाकांच्यासारखे भीष्माचार्य आमच्या पाठीशीं असल्यावर आम्हांला यश खात्रीपूर्वक मिळणार आहे. आपल्या सर्व फौजा एक झाल्यावर मेवाडाधिपतीचे आपल्याकडे कांहीं चालणार नाहीं. मात्र आपल्या सर्व फौजा झपाट्यानें एकत्रित केल्या पाहिजेत. आजच सांडणीस्वाराचे हातीं श्रीमंत छत्रपतींना व श्रीमंत नानांना पत्र पाठविण्यास बाबांस सांगतों. आपणही मोठ्या तयारीनेंच गेलें पाहिजे.

**सुभेदार मल्हारराव.**—बाबा, हे जयपूरप्रकरण म्हणजे मामूली बात नव्हे. मोठमोठ्यांच्या अकली गुंग होऊन जातील. शिवाय राजपुतांशीं प्रसंग असल्यानें आणखी अधिकच बिकट आहे. पण आप्पा कांहीं काळजी करण्याचें कारण नाहीं. (खंडेराव येतो. ) खंडेराव, आपण हातीं घेतलेलें काम फार महत्त्वाचें आहे. तूं सर्व परिस्थितीचा चांगला अभ्यास कर. आतां हळूहळू बावळटपणा सोडून दे. पुढें आमच्या मागें तुझ्यावर मोठी जबाबदारी पडणार आहे.

**खंडेराव.**—काका, तुम्हीं माझ्यावर वेगवेगळीं कामें टाकून पहा ! कशीं अगदीं बेमालूम पार पाडतों. (जयाप्पाकडे पहात) आम्हांला आपले सर्वांनींच बावळट ठरविलें आहे ! घरांतली माणसेंच जर मला बावळट, उतावळा म्हणूं लागलीं तर बाहेरची साहजिकच म्हणतील.

**राजे जयाजीराव.**—भैय्या, जाऊं देरे. लोक कांहीं का म्हणेनात. आपण आपलें कर्तव्य करीत रहावें म्हणजे आपणांस कांहीं कमी पडत नाहीं. काका, चला आतां जरा गोड गोड फराळ करूं. उद्यां मात्र सर्वांनीं जयपुराकडे कूच करावयास पाहिजे.

**सुभेदार मल्हारराव.**—अप्पा, चला. तुमच्या वहिनीनें सर्व तयारी करून ठेविली असेल. खंडेराव, तूं आजच्याप्रमाणें मोकळ्या मनानें रहात जा. ह्यांच्या संगतींत आलों कीं सर्वकांहीं विसरून जातों. मनांतला रोष थोडासुद्धां रहात नाहीं. चला, आतां सर्वजण प्रथम फराळ करूं या. (सर्व पडद्यांत जातात).

---

## अंक पहिला

### प्रवेश २ रा

( जयपूरजवळील मराठ्यांची छावणी. रामचंद्रबाबा कचेरीच्या बैठकींत बसले आहेत. )

**रामचंद्रबाबा.**—श्री छत्रपतींना व श्रीमंतांना पत्रें लिहून बरेंच दिवस झाले अद्याप जबाब नाहीं, म्हणून थोडी काळजी वाटते. इकडून पत्रें गेलीं कीं, लागलीच सांडणीस्वाराबरोबर उलट जबाब येत असे. मग ह्या वेळींच असें का व्हावें ? इकडील मामला तर निकडीचा आहे. तिकडील नक्की धोरण कळल्याशिवाय तिकडे पाऊल टाकणें योग्य वाटत नाहीं. राजांनीं केलेली कारवाई जर त्यांना पसंत पडली नाहीं तर सगळा बार ह्या म्हाताऱ्यावर यावयाचा. दिल्लीच्या हिंगण्यांना पत्रें पाठविलीं व बादशाही इरादे काय आहेत ह्यासंबंधीं चौकशी केली तर तिकडीलही कांहीं जबाब नाहीं. सध्यां इकडे आड व तिकडे विहीर असें झालें आहे. या राजकारणाच्या उलाढाली दिवसें-दिवस बिकट होऊं लागल्या आहेत. सर्व मनसुबे नीट तडीला गेले, तर ह्या म्हाताऱ्याची अब्रू वांचेल, नाहींतर श्री. छत्रपति चांगली हजरी घेतल्यावांचून रहाणार नाहींत. (राजे जयाजीराव येतात, बाबा उभे राहून मुजरा करतात).

**राजे जयाजीराव.**—बाबा, आपण माळवा सोडून जयपुरांत आलों. राजश्रींना व नानांना पाठविलेल्या पत्रांचे जबाब अजून आले नाहींत. लढाईला तोंड लागण्याची वेळ तर आली आहे.

ईश्वरसिंहजी मदतीकरितां सारख्या विनवण्या करीत आहेत. आमच्या फौजा इकडे आलेल्या आहेत हें कळल्यापासून जगतसिंह व माधवसिंहजी कडेकोट तयारी करून चालून येत आहेत. शिवाय कोटा व बुंदी येथील राजेही त्यांच्या मदतीला आले आहेत. प्रसंग मोठा बिकट आहे. उत्तरेकडील आपल्या फौजा एक झाल्या पण दक्षिणेकडून फौजा किंवा नुसता जबाब देखील आला नाहीं, म्हणून हें जयपूरप्रकरण हातीं घ्यावें कीं नाहीं असा मोठा पेंच पडला आहे. बाबा, तुमचे या बाबतींत काय म्हणणें आहे ?

रामचंद्रबाबा.—छोटे सरकार, आपण जी योजना हातीं घेतली आहे ती यथायोग्य आहे. थोरल्या सरकारांनीं राजपुतांना आपल्यांत मिळवून घेण्याची शिकस्त केली होती. जयपुर, जोधपुर व उदेपुरचे राणाजी त्यांनीं एक केले होते. बुंदेलखंडांतील बुंदेले वीर त्यांनीं संघटित केले होते. दिल्लीपतीला शह द्यावयाचा तर सर्व हिंदुमात्रांनीं, विशेषतः राजपूतमराठ्यानीं एक होऊन विरोध करावयास पाहिजे, ह्या तत्त्वानें ते वागत होते. आजचा मामला थोडा वेगळा आहे. जयपूरमेवाड ह्यांच्यांतील हा आपसांतील तंटा आहे. तो लवकर मिटविलाच पाहिजे. नाहींतर दिल्लीपति व त्याचे वजीर ह्यांत हात घालून मामला अधिक बिघडवितील. राजपुतांतील ही फूट भयंकर नुकसान करील. राजश्रींना किंवा श्रीमंतांना सहज समजावतां येईल, पण गेलेली वेळ मात्र पुनः येणार नाहीं. म्हणून ज्या धडाडीनें व निश्चयानें आपण येथवर आलों तें कार्य नेटानें सुरू करावें व तात्काळ त्यांचा निकाल लावून टाकावा.

राजे जयाजीराव.—बाबा, तुमचे म्हणणें मला कबूल आहे. मुतालीक म्हणून माझ्यावर फार मोठी जबाबदारी आहे हें तुम्हीं जाणतांच. प्रकरण यशस्वी झालें तर सर्व शाबासकी देतील पण अपयश आलें तर सर्व भंडावून सोडतील. तोंड दाखवावयास जागा राहाणार नाहीं. शत्रुपक्ष फार जबरदस्त आहे. त्यामुळें जरा काळजी वाटते. आतां निश्चय झाला तो कायम ! आपल्या फौजा आहेतच. मल्हारकाकांच्या फौजाही तयार आहेत. जाधवराव व पवार ह्यांच्या फौजा वाट चालत आहेत. तेव्हां हें प्रकरण एकदां निपटून टाकलेंच पाहिजे. घाई केली तर बादशहाची कुमक येण्याच्या आंत सर्व निकाल लागून जाईल. बरं बाबा, हिंगण्यांना पत्र लिहून दिल्लीची हकीकत सविस्तर मागवा. त्यांच्यामार्फत बादशहाला एक पत्र लिहा व त्यांत त्यांनीं ह्या भानगडींत पडूं नये असें स्पष्ट कळवा. बादशहा जर ऐकणार नाहीं तर आम्हीं दिल्लीवर चाल करून जाऊं अशी त्यांत स्पष्ट दहशत घाला म्हणजे हे अविंध स्तब्ध बसतील व आपलें काम सोपें होईल.

रामचंद्रबाबा.—सरकार, मसलत ठीक आहे. आपणांस चांगलेंच यश मिळेल. राजश्रीं-कडूनही बादशहाला एक पत्र पाठवावें व ईश्वरसिंहजींची बाजू सत्याची आहे म्हणून त्यांनाच मदत करणें जरूर आहे असें त्यास साफ साफ कळविलें जावें. मग बादशहा किंवा वजीर आमच्या विरुद्ध जाण्याची हिंमत करणार नाहींत.

राजे जयाजीराव.—बाबा, तुमचें म्हणणें बरोबर आहे. तुम्हीं अनुभवी माणसें, तुमचे विचार पोक्त, अनुभवाचे व हितकारीच असणार. मग जी योजना आपण सुचविली, ती ताबडतोब अमलांत आणा. आतां युद्धाला तर सुरुवात करावयाचीच. बरं, काका व खंडेराव ह्यांना बोलावणें पाठवून बराच वेळ झाला अजून कसे आले नाहींत ? महाराणा ईश्वरसिंहजीही आतां भेटीस येणार आहेत. त्याच्या अगोदर वाटाघाट झालेली बरी. बाबा, काका व खंडेराव हे अलीकडे जरा वेगळ्याच रीतीनें वागूं लागले आहेत. आम्हांला मिळालेली मुतालकी त्यांना आवडली नाहीं. ते आपला मोठा अपमान झाला असें समजतात. हें मोठें शल्य त्यांच्या मनांत बोंचत आहे. मी तें काढून टाकण्याचा प्रयत्न

केला, पण अजून त्यांची समजूत होत नाहीं. बाबा, त्यांचे असे विचार राहिल्यास शिंदेहोळकरांची जोडी रहावी कशी? उत्तरेकडील सर्व भिस्त दोघांच्या ऐक्यावर आहे. मी वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास तयार आहे, पण आमचे हें जुग फुटतां कामा नये. मी मराठ्यांच्या दौलतीकरितां प्राणाचीही पर्वा करणार नाहीं, मग या क्षुद्र अधिकारांची काय कथा आहे. बाबा, रात्रंदिवस आतां या दौलतीच्या फिकीरीनें क्षणभर झोंपही मिळत नाहीं. थोरल्या आबासाहेबांचे व परमप्रिय बाबांचे तें हिंदवी स्वराज्यस्थापनेचें ध्येय कधीं पूर्ण होईल, हाच ध्यास सतत लागलेला आहे. मराठेशाहीचा व्याप दिवसेंदिवस वाढत आहे. म्हणून आम्हांमध्यें ऐक्याची आवश्यकता अधिक आहे.

**रामचंद्रबाबा.**—छोटे सरकार, आपले विचार खाशांना शोभण्यासारखेच आहेत. आजवर होऊन गेलेल्या मराठेशाहींतील मुगुटमणींनीं तिच्याकरितां कशी हाडांचीं काडें केलीं व केवढे दिव्य व स्वार्थत्याग केले हें सरकार जाणतातच. त्यांच्या अमर कीर्तींत सरकारांनींही भर घालावी हेंच युक्त आहे. ही आशा पूर्ण झालेली आम्हीं जेव्हां पाहूं त्या वेळींच आमच्या डोळ्यांचें पारणें फिटणार आहे. शिंदेकुलभूषणा, सर्व मराठी दुनियेचेच नव्हे तर अखिल हिंदुमात्राचे डोळे आपल्याकडे लागून राहिले आहेत.

**राजे जयाजीराव.**—कर्तव्य करणें हेंच आमच्या हातीं आहे. उत्तम फलप्राप्ती देणें हें त्या भगवंताच्या स्वाधीनचें आहे. बाबा, पण ही होळकर मंडळी अद्याप कशी आली नाहींत? (इतक्यांत अहिल्याबाई व दासी येतात) कोण, वहिनी? (उठून नमस्कार करतात) आपण या वेळीं इकडे कशा? काका व भैय्या अद्याप कसे आले नाहींत?

**अहिल्याबाई.**—भावोजी, मी खरं सांगूं? तुम्हीं जरा सावधच असा. तुम्हांला मुतालकीचे अधिकार मिळाल्यापासून आमच्या दोघा पुरुषांच्या अंगांत कलिप्रवेश झाला आहे. वेळोवेळीं स्वार्थ व मानापमानाच्या कल्पना त्यांच्या डोक्यांत थैमान करूं लागतात तेव्हां अशा पुरुषांवर विश्वास जरा बेताचाच ठेवावयास पाहिजे.

**राजे जयाजीराव.**—वहिनी, काय म्हणतां तुम्हीं? काका व भैय्या विश्वासपात्र नाहींत? मग सगळाच कारभार आटोपला. मी एकाकी ह्या झगड्याशीं कसा टक्कर देणार? वहिनी, तुमच्या-सारखी साध्वी सांगत आहे, मग मला सावध राहिलेंच पाहिजे. पण वहिनी, तुम्हांला असें केव्हां-पासून वाटूं लागलें?

**अहिल्याबाई.**—वेळोवेळीं जेव्हां जेव्हां अधिकाराचा प्रश्न निघतो, किंवा द्रव्यप्राप्तीचा विषय निघतो, तेव्हां दोघांचं बोलणं ऐकावं. मग असं गरल ओकूं लागतात कीं, तें ऐकवतसुद्धां नाहीं. आज अशाच गोष्टी चालल्या होत्या. भावोजी, तुम्हांला वेळींच सावध करणं हें माझं कर्तव्य म्हणून मी कांहींतरी बहाणा करून चटकन तुमच्याकडं आले. मराठ्यांची दौलत राहिली पाहिजे, तिची बेअब्रू होतां कामा नये, ह्याकरितां सर्वांनीं धडपड करावयाची आहे. आमच्या पुरुषांना स्वार्थापलीकडे व मानापमानाच्या कल्पनेपुढें सध्यां कांहीं सुचत नाहीं!

**राजे जयाजीराव.**—बाबा, पाहिलंत. हिला म्हणतात राजलक्ष्मी! धर्माची मूर्तिमंत पुतळी! त्यागाचा मूर्तिमंत अवतार! अशा सौभाग्यलक्ष्मीच्या पुण्याईमुळेंच मराठेशाही वाढीस लागली आहे. वहिनी, धन्य आहे तुमच्या मराठेशाहीच्या प्रेमाची! बरं, काका व भैय्या इकडे येणार आहेत किंवा नाहींत? महाराणा ईश्वरसिंगजी आतांच दरबारास येणार आहेत. चालू प्रश्नाचा प्रथम विचार करून दिला पाहिजे! नाहींतर आमचें एकमत तर काकांचें दुसरेंच असें प्रगट होऊन अधिकच फजीती व्हावयाची!

**अहिल्याबाई.**—दोघंही यावयास तर निघाले होते. इतक्यांत त्यांच्या वेडानं जोर केला व मुतालकी व मानापमान ह्यांच्याच गोष्टी सुरूं झाल्या. त्या इतक्या कीं तुमच्याकडं जाणंसुद्धां त्यांना कमीपणाचं वाटूं लागलं. म्हणून मी सावध करण्यास इतक्या तांतडीनं इकडं आलें. तेही आतां येत असतीलच. खाशा स्वाऱ्या आल्याच वाटतं. (सुभेदार मल्हारराव व खंडेराव येतात. अहिल्याबाई व दासी सरकून बाजूस उभ्या राहतात).

**सुभेदार मल्हारराव.**—कोण अहिल्या? तुम्हीं आमच्याही अगोदर इकडे आलांत!

**खंडेराव.**—इकडे यावयाचें असें बोललां असतात तर आम्हीं नसतें कां बरोबर आणलें? कां? कांहीं मेजवानीचा बेत आहे वाटतें?

**राजे जयाजीराव.**—वहिनी, तुम्हीं आहां घरचीं माणसें. वाटेल तेव्हां मेजवानी होऊं शकते. आज सर्वांनींच इकडे भोजन करावें.

**अहिल्याबाई.**—आमची कांहीं ना नाहीं. मामंजींना व यांना मात्र विचारा.

**सुभेदार मल्हारराव.**—सर्वांची इच्छा असल्यावर आमचीही आहेच.

**खंडेराव.**—अप्पा, आज मात्र अगदीं खासा बेत झाला पाहिजे!

**अहिल्याबाई.**—भावोजी उत्तम उत्तम मेजवान्या करतील. तुमच्या म्हणण्याप्रमाणं वागतील. पण मामंजींनीं व तुम्हीं मात्र आपलीं मनं साफ ठेवून या जयपूरच्या राजकारणाची व्यवस्थित तड लावावी. आज हिंदवी स्वराज्याकरितां सर्वांनींच आपणांतील मतभेद विसरले पाहिजेत. अधिकारलालसा फार वाईट! तिनें मोठमोठ्या कार्यांचा सर्वनाश झालेला आहे. मुतालकीच्या अधिकारानं तुम्हीं नेहमीं मत्सरग्रस्त होतां हें मुळींच योग्य नाहीं. भावोजी जितक्या मोकळ्या मनानं व उमद्या वृत्तीनं वागतात तितक्या मोकळ्या व दिलदार वृत्तीनं तुम्हीं वागावं अशी तुम्हां दोघांना माझी विनंति आहे.

**सुभेदार मल्हारराव.**—बाळ, तुम्हीं नेहमीं आमच्या मर्मावरच घाव घालतां. मग आम्हांला वाटतें मुतालकी आमच्या हक्काची असून ती आम्हांस मिळाली नाहीं हें अयोग्य झालें.

**खंडेराव.**—तुझें आपलें अप्पाची बाजू धरून नेहमीं उपदेश करण्याचें काम चालूं रहातेंच! त्याला कधीं खळ पडावयाचा नाहीं.

**अहिल्याबाई.**—मला ज्या हिताच्या गोष्टी वाटतात त्या मी नेहमीं स्पष्ट बोलतें. मग तुमचं आपलं राजकारण चालूं द्या. मी आंत जाऊन महाराणीसाहेबांची भेट घेतें. हिरा, चल मला वाट दाखव!

**राजे जयाजीराव.**— वहिनी, भोजन केल्याशिवाय मात्र जावयाचें नाहीं!

**अहिल्याबाई.**—आम्हांला आग्रहाची मुळींच जरूरी नाहीं. महाराणीसाहेब कांहीं आम्हांला जेवल्याशिवाय जाऊं देणार आहेत? आपण या खाशा मंडळींना मात्र जेवणास थांबवून घ्यावं.

**राजे जयाजीराव.**—ठीक आहे. हिरा वहिनींना वाट दाखव.

**दासी.**—चलावं सरकार. (अहिल्याबाई व दासी जातात).

**सुभेदार मल्हारराव.**—अप्पा, इतक्या निकडीनें कां बोलावलेस बाबा? कांहीं जरूरी काम आहे कां?

खंडेराव.—हो असेल तर! मुतालकीच्या डेऱ्यांत सर्व सरदारांनीं येऊन सर्वाधिकाऱ्यांना ताजीम नको का द्यावयास? आपले अधिकार प्रस्थापित करण्याच्या ह्याच तर पद्धति असतात!

राजे जयाजीराव.—भैय्या, अशा तऱ्हेनें टोंचून बोलून तूं नेहमीं माझ्या कोंवळ्या मनावर आघात करतोस! माझ्या हृदयाला तूं सारखे चिमटे घेत असतोस. भैय्या, अशा प्रकारें उपरोधिक बोलून माझ्या कोवळ्या मनाला दुखवूं नकोस. हजार वेळां सांगितलें कीं, हें सर्वाधिकारित्व मला नको आहे. मी साधा शिपाई म्हणून काम करण्यासही तयार आहे. दरबारची तयारी करावी म्हणून मी सारखा तुमची वाट पहात होतों. महाराणा ईश्वरसिंहजी आतांच आपणांस भेटावयास येणार आहेत व सर्व प्रकारचे ठराव करून जाणार आहेत.

सुभेदार मल्हारराव.—बरें केलेंत बाबा तुम्हीं मला बोलावलेंत. मी आतां त्या ईश्वरसिंहजीस चांगलाच घेरतों. त्याला मदत करावयाची हें निश्चित, पण नजराणे मात्र भरपूर मिळाले पाहिजेत. ईश्वरसिंहजींची बाजू सत्याची आहे म्हणून सत्पक्षाचा अभिमान बाळगून सर्व कार्यें यथासांग नीपटलीं जातील.

खंडेराव.—काका, काय करावं तुम्हांला? घरीं असतां त्या वेळीं एक गोष्ट ठरवितां व बाहेर आलांत कीं लागलीच दुसरी. अहो, आमची ही प्रजा सुखी असावयास पाहिजे, एवढी तरी व्यवस्था करा म्हणजे आम्हीं मिळविली. दुसऱ्याच्या घरच्या भानगडी घेऊन मनुष्यहानि व द्रव्यनाश करून घेण्याची काय आवश्यकता आहे? आपलें नुकसान करून घ्या व मोठेंपणा मिरवा हें पाहिजे कशाला? आज या जयपूरच्या भानगडींत न पडणेंच बरें. राणाजी आल्यावर त्यांना स्पष्टपणें हेंच सांगावें व आपल्या फौजा घेऊन माळव्याकडे परत जावें. बाबा, अजून दक्षिणेंतूनही पत्र किंवा उलट निरोप आला नाहीं ना? मग उगीच भानगडींत कशाला पडावें?

रामचंद्रबाबा.—भैय्याजी, दक्षिणेंतून अजून कांहींच उत्तर आलें नाहीं. पण आतां जयपूर-जवळ येऊन परत माघार घेऊन जाण्यानें मराठ्यांचा बदलौकिक अधिक होईल. आपण इतके आघाडीवर आहोंत कीं आतां मागें पाऊल घेतां येणार नाहीं.

राजे जयाजीराव.—शिवाय आपण वचनबद्ध झालों आहोंत! सैन्याचा खर्चही राणाजींकडून चालू झाला आहे. काळजी वाटते ती ही कीं आपल्या ह्या स्वारीला दक्षिणेंतून संमति आली नाहीं. तर आतां सर्वांनीं मिळून एकविचारें अखेरचें कांहींतरी ठरवावें व पुढें चालावें.

सुभेदार मल्हारराव.—रामचंद्रबाबा म्हणतो तसेंच मलाही वाटतें. आतां आम्हीं मागें घेतां उपयोगी नाहीं. राजश्रींची किंवा पेशव्यांची संमति आली नाहीं म्हणून इकडील कार्यें बंद ठेवण्याची आवश्यकता नाहीं. उत्तरेकडील सर्व जिम्मेदारी आपली आहे. परिस्थितीप्रमाणें योग्य तो विचार करून आम्हीं निश्चितपणें वागण्यास नेहमींच मोकळे आहोंत. म्हणून मदतीकरितां पुढें केलेला हात आतां मागें घ्यावयाचा नाहीं. खंडेराव आहे अप्रबुद्ध! अप्पा, त्याच्या बोलण्याकडे लक्ष न देतां धडाडीनें कार्यास लागावयाचें. मात्र राणाजी आले म्हणजे पैसा मात्र अधिक उकळावयाचा! राजश्रींना किंवा पेशव्यांना पैसा मिळाला म्हणजे झालें! मग तुम्हीं इकडे वाटेल ते करा. त्याबद्दल तुम्हाला ते कांहीं बोलणार नाहींत.

राजे जयाजीराव.—काका, ठीक आहे. तुमची व बाबांची सल्ला मला मान्य आहे. भैय्या, आपण पडलों तरुण! वडील मंडळींचा सल्लाच योग्य असणार! तर आपण हेंच ठरवूं कीं

हें जयपूरप्रकरण आतां शेंवटास न्यावयाचें ! बाबा, दरबारची सर्व तयारी आहेच. राणाजीचें स्वागत खास रीतीनें व्हावयास पाहिजे.

**सुभेदार मल्हारराव**.—अप्पा, माझें ऐका. आजचा हा आम दरबार करूं नका. फक्त खाशा स्वाऱ्यांनींच राणाजीचें स्वागत करावें. युद्धाचे प्रश्न आम दरबारांत चर्चेला घेऊं नयेत. खासगी रीतीनें त्यावर विचार करून धोरण निश्चित करावें. बाबा, तुम्हांला काय वाटतें. खासगी दरबार करणें बरें कीं आम दरबार करणें बरें ?

**रामचंद्रबाबा**.—सुभेदार, आपण मुत्सद्दी आहांत, आपलें म्हणणें बरोबर आहे. अशा आणीबाणीच्या वेळेस आम दरबाराची कांहीं आवश्यकता नाहीं. राणाजीसही कदाचित् ती गोष्ट पसंत पडणार नाहीं. आपण मंडळी आहांत, शिवाय ही बैठक खासगी दरबारास ठीक आहे. वैभव दाखविण्याची किंवा तें उपभोगण्याची ही वेळ नाहीं. शत्रु अगदीं दाराशीं येऊन बसला आहे. त्याचा बंदोबस्त करणें हेंच राणाजींला अधिक आवडेल !

**राजे जयाजीराव**.—बरें तर राणाजी येतांच आपण इथेंच खासगी बैठक करून धोरण निश्चित करूं. त्यांची येण्याची वेळ होत आली आहे. हं, आलेच वाटतें ते. शिंग वाजत आहे व डंकाही वाजूं लागला आहे. (शिंग व डंका वाजूं लागतो). काका, बाबा, आतां आपण एकविचारें राहून राणाजींना उत्तर द्यावयाचें आहे. भैय्या, तुम्हीं मध्यें कांहीं न बोलतां काका सांगतील तसेंच वागावें. नाहींतर तुम्हीं कांहींतरी बोलून जाल व घोंटाळा होईल. आपणास काय, वडील माणसें ठरवितील त्याप्रमाणें वागावयाचें.

**खंडेराव**.—हो, हो. आम्हीं मूर्खच कीं नाहीं. तुम्ही आम्हांला कसें बोलून द्याल ? मग तुमचा फायदा कसा होईल. काका आमचे भोळे. तुमच्या बोलण्यानें त्यांना भुरळ पडते. ते तुमचेंच म्हणणें ऐकणार. तुम्हीं सर्वांनीं एक एक विशेषणाची जोड माझ्या पाठीमागे लावून मला पदवीधर बनविण्याचें धोरण चांगलेंच आंखलें आहे ! मूर्ख, बावळट, उतावळा ! वा ! काय खाशा व निवडक पदव्या ! आम्हांला आमच्या घरच्यांनींच ह्या अर्पण केल्या आहेत ! अप्पा, काळजी करूं नका. माझी अशी मुस्कटदाबीही पण करूं नका. बोलेन तें फायद्याचेंच बोलेन. गैरवाजवी बोलणार नाहीं. बाकी तुम्हीं सर्वांनीं मला खूप बनविलें आहे हं !

**राजे जयाजीराव**.—भैय्या, तसें नाहीं हो. तुम्हांला बोलण्याची बंदी नाहीं. पण आपण सर्वच बोलूं लागलों तर तें ठीक दिसणार नाहीं. म्हणून वडील मंडळींकडेच हें काम सोंपवूं. ही मंडळी धोरण ठरवितील तें आपणांस मान्य.

**खंडेराव**.—पहा बर अप्पा, तुम्हीं बोलला कीं हा खंडेराव बोलल्यावांचून रहाणार नाहीं. हो तुम्हीं बोलावें व मी चुप बसावें हें आमच्या इभ्रतीला शोभणार नाहीं. वेडेवांकडे दोन शद्ब तरी बोललेच पाहिजेत. नाहींतर राणाजीही मला मूर्ख, बावळट व उतावळा म्हणूं लागतील.

**राजे जयाजीराव**.—बरं बाबा, बोलावेसें वाटलें तर जरा सांभाळून व विचारपूर्वक बोल, म्हणजे झालें. भालदार ललकारतो आहे. राणाजी आले वाटतें. काका, त्यांच्या स्वागतास तयार व्हा. (भालदार ललकारीत महाराणा ईश्वरसिंहास घेऊन येतो. बरोबर हरगोविंद येतो.) यावें महाराणाजी ! हा शिंदेराव आपणांस मुजरा करतो !

**सुभेदार मल्हारराव**.—महाराणाजी, हा मल्हारबा तुम्हांला आशीर्वाद देतो.

**खंडेराव**.—हा सुभेदारपुत्र खंडेराव राणाजीस मुजरा करतो.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—सुभेदार, आमचा तुम्हांला नमस्कार. शिंदेराव, खंडेराव रामराम. तुम्हांला पाहून मला फार फार आनंद झाला आहे. आपण माझ्या साहाय्याला धांवून आलांत हें पाहून धन्यता वाटते मला. या प्रसंगीं मला वडिलांच्या वेळची आठवण येते. कैलासवासी राजे राणोजीरावबाबा व आमचे वडील ह्यांचा केवढा स्नेह ! ते एकमेकांस क्षणभर देखील विसरले नाहींत. हिंदुपदपातशाहीच्या मुख्य कार्यास त्यांनीं आपणांस वाहून घेतलें होतें. वडील पुष्कळ धोरणी होते. त्यांनीं आम्हां भावांत तंटा होऊं नये म्हणून जिवंत असतांनाच व्यवस्था केली होती. पण दुर्दैव आमचें! शत्रूंनीं पुरा दावा निर्माण केला. आम्ही त्यांच्या मानानें कमजोर असल्यानें पूर्व ऋणानुबंधास अनुसरून आम्हीं शिंदेरावांना शरण आलों आहोंत. म्हणून आपण आतां आम्हांस पूर्ण मदत करावी व जयपूरच्या गादीचा तंटा कायमचा मिटवावा.

**खंडेराव**.—राणाजी, आपण हें फार चांगलें केलेंत कीं शिंदेबाबांना शरण आलांत. त्यांच्याकडेच आपण यावयास पाहिजे होतें. मराठ्यांचे ते मुतालीक आहेत ना ! अहो आमच्यासारख्या इतर बाजारबुणग्यास शरण जाऊन कांहीं उपयोग होणार नव्हता. राजे खरं कीं नाहीं ? अहो देवळांत गेल्यावर मुख्य देवालाच नमस्कार करावयास पाहिजे. मग तो गणोबा कां असेना !

**सुभेदार मल्हारराव**.—राणाजी, शिंदेरावांना शरण आलांत हें ठीकच केलेंत. पण सवाई जयसिंहजींचा व आमचाही तितकाच स्नेह होता. राणोजीबाबांइतकेच ते आम्हांलाही मानीत होते. आतां तुम्ही तरुण म्हणून तुमचा ओढा तरुणाकडे असणारच. आम्हांला ह्यांत संतोषच आहे.

**खंडेराव**.—काका, असं नव्हें ! आम्हीं नाहीं कां तरुण ? पण शिंदेराव पडले सर्वाधिकारी ! तेव्हां आमच्याऐवजीं त्यांच्याकडेच आपला अधिक ओढा असणार. होळकरांच्याकडे आपला ओढा कमीच रहाणार हें आम्हांस पहिल्यापासून माहीत आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—आमचा हेतु तसा नाहीं. शिंदेराव व होळकर दोघेही आम्हांला पूज्य आहेत. ते मराठ्यांचे दोन आधारस्तंभ आहेत हे आम्ही जाणतों. होळकरांना दुखविण्याकरितां आम्ही तसें म्हटलें नाहीं. आम्हांला सर्व मराठ्यांची मदत पाहिजे. आपण मनांत रोष धरूं नये. प्रसंग मोठा बाका आहे.

**राजे जयाजीराव**.—राणाजी, आमची सर्व मंडळी एकदिलाची आहेत. आपण कांहीं काळजी करूं नका. आमची ही मंडळी मला मोठेपण देणाच्या दृष्टीनें तुम्हांला अशी बोलत आहेत. विपरीत अर्थ मनांत घेऊं नये. बरं आतां मुख्य विषयासंबंधीं बोला. तुम्ही मराठ्यांना नजराणे किती देणार ?

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—राजे, तुम्ही घरचीं माणसें ! तुम्हांला नजराण्याची काय आवश्यकता आहे ? ज्यांना नजराणा पाहिजे असेल ते मागून घेतील !

**सुभेदार मल्हारराव**.—हो राणाजी, होळकरांना नजराणा पाहिजे ! श्रीमंत छत्रपतींना नजराणा पाहिजे. पेशव्यांना नजराणा पाहिजे. राजे तुमचे घरचे म्हणून त्यांना नजराण्याची आवश्यकता नाहीं.

**राजे जयाजीराव**.—राणाजी जर मला आपलेच म्हणतात तर शिंदेराव नजराणा मागणार नाहींत. आतां राजश्री, श्रीमंत व होळकर ह्यांचे नजराणे बोला.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—राजे, असें करा. एकदम रक्कम आपणच सांगा. मग त्याची वाटणी करण्याचें काम आपलें आहे. वाटणी कशी करावयाची हें आपणांस चांगलें माहीत असणार!

**सुभेदार मल्हारराव.**—राणाजी, पंधरा लाख रुपये नजराणा म्हणून तुम्हीं मराठ्यांना द्यावा. मग मी करीन त्याची वाटणी.

**खंडेराव.**—वाटणीचें काम काकांना जमलें नाहीं तर मी करीन. काका आतां म्हातारे आहेत. एखाद्या सरदारास विसरून जातील.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—सुभेदार, आम्हीं अडचणींत आहोंत ! सैन्याचा खर्च ठरावा-प्रमाणें आमच्याकडून चालू आहेच. शिवाय इतकी मोठी रक्कम यावयाची व शिवाय दुसरा आणखी युद्धखर्च करावयाचा ! आपणच विचार करा. आमची स्थिति किती वाईट होईल. आपणही राजे आहांत ! राजाच्या अडचणी काय असतात हें आपण जाणतांच ! इतका पैसा प्रजेवर लादणें म्हणजे तिच्यावर जुलूम करणें आहे. यानंतर आपल्या सांगण्याबाहेर आम्हीं नाहीं. तुम्हीं जें सांगाल तें आम्हांला मान्य आहे.

**राजे जयाजीराव.**—काका, प्रजेचें नांव काढलें कीं,माझ्या हृदयाला कसा पीळ पडतो. पंधरा लाख आम्हीं मागण्यापेक्षां जेवढे राणाजीस सहज देतां येतील तेवढेच त्यांनीं द्यावे. त्यांत आमची सर्वांची समज होईल. नजराणा म्हणजे लूट नव्हे ! सामर्थ्य असेल तेवढाच द्या, असें आम्हीं सुचवितों. बाबा, तुम्हांला काय वाटतें ?

**रामचंद्रबाबा.**—सरकार, जुलूम-जबरदस्ती करून नजराणा घेणें योग्य नाहीं. शरण आलेल्यास मरण देऊं नये म्हणतात ! मग हें द्रव्यद्वारा मरण देणें योग्य होणार नाहीं. राणाजी, आपली काय इच्छा आहे ?

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—हरगोविंद, आपल्या खजीन्याची स्थिति थोडी वर्णन करून सांगा, म्हणजे सर्वांची खात्री होईल.

**हरगोविंद.**—महाराणाजी, मोठे राणाजी वारल्यापासून आज तीन वर्षें सतत दुष्काळ पडून राहिला आहे. त्याच्या पूर्वी सारख्या लढाया चालू असल्यानें खजीन्याची स्थिति समाधानकारक नव्हती. सध्यां खजीना अगदीं रिता असून एवढी मोठी रक्कम देऊं शकणार नाहीं. यावर महाराणाजी हुकूम करतील तो मान्य आहे. उभयतां सरकारांना माझी अशी विनंति आहे कीं नजराण्याकरितां आम्हांला आपण तंग करूं नये. आरंभीं थोडा घ्यावा. मग कार्य उरकल्यावर सवलतीनें बाकीचा घ्यावा.

**राजे जयाजीराव.**—बरें राणाजी, आपण असें करा, सध्यां पांच लाख द्या व लढाई संपून यश मिळाल्यावर बाकीचे दहा लाख द्या. कारण आमच्या काकांचा शब्द आम्हांला राखला पाहिजे. काय काका, मी म्हणतों तें खरें कीं नाहीं !

**सुभेदार मल्हारराव.**—अप्पांच्या म्हणण्याबाहेर आम्ही जाणार नाहीं.

**खंडेराव.**—ही तडजोड ठीक आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—राजे, आतां असें करा. तीन लाख तर मी आतां आरंभीं देतों व बाकी बारा लाख लढाई संपतांच थोड्या दिवसांत देतों. या रकमेंत कसेंतरी भागवून घ्या. अशी माझी तुम्हां सर्वांना विनवणी आहे.

**राजे जयाजीराव.**—काका, बाबा, बोला. तुम्हां वडील मंडळीचें काय म्हणणें आहे ? तुमच्याबाहेर आम्हीं नाहीं. तुम्ही दोघे विचार करून एकदां नक्की ठरवा.

**खंडेराव.**—हें राणाजींचें म्हणणें आम्हांला मान्य नाहीं. राजांनीं म्हटल्याप्रमाणें पांच लाख आतां व नंतर दहा लाख द्यावेंत म्हणजे शिंदेहोळकरांच्या म्हणण्याला मान दिल्यासारखें होणार आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—ठीक आहे. आपलें म्हणणें आम्हांला मान्य आहे, सध्यां आम्हीं पांच लाख रुपये नजराणा देतों. हरगोविंद, पांच लाखांचे तोडे उद्यां सकाळीं राज्यांच्याकडे पोहोंचते करा.

**खंडेराव.**—त्यांच्याकडे नाहीं. ते माझ्याकडे किंवा काकांच्याकडे आले पाहिजेत.

**राजे जयाजीराव.**—बरें राणाजी, सर्व रक्कम मल्हाररावकाकांकडे जमा करा व पावती घेऊन ती मजकडे द्या, म्हणजे मी ती राजश्रींकडे पाठवून देईन व श्रीमंतांचेंही समाधान करीन. रक्कम काकांकडे आली काय किंवा आम्हांकडे आली काय सर्व एकच आहोंत.

**सुभेदार मल्हारराव.**—वा असें कसें? राणाजी म्हणतात तेंच बरोबर आहे. राजे मुतालीक आहेत. कायद्यानें रक्कम त्यांच्याकडेच यावयास पाहिजे. राणाजी तुम्ही तरी राजांच्याकडेच पाठवा. अप्पा, तिची वाटणी मग मी करीन.

**राजे जयाजीराव.**—ठीक आहे. राणाजी उद्यां रक्कम पाठवून द्या.

**खंडेराव.**—काका, मग मी कोणीच नाहीं का? आम्हांला विचारतो कोण! काका व अप्पा एक होतात. आम्हीं आपले मूर्ख, बावळट, उतावळे!

**राजे जयाजीराव.**—भैय्या, नाराज होऊं नका. रक्कम आली कीं पहिले तुमच्या हातांत. तुम्हीच आपल्या हातानें सरकारी तिजोरींत ठेवा व कुलूप लावा. बरें, काका सांगतील त्याप्रमाणें वाटणी करावयाची आहेच. मग होईल कीं नाहीं तुमचें समाधान?

**खंडेराव.**—हो हो. असंच व्हावयास पाहिजे. मी सर्व रक्कम मोजून घेईन व सरकारी खजिन्यांत माझ्या हातानें ठेवीन. मी मोजायला कांहीं चुकणार नाहीं, कारण उजळणी मी चांगली शिकलों आहे.

**राजे जयाजीराव.**—बरें हें कार्य संपलें! आतां वेळ बराच झाला आहे. सर्व मंडळींनीं इथेंच भोजन करावें. बाबा, माणसांना भोजनाची तयारी करावयास सांगा.

**रामचंद्रबाबा.**—ठीक आहे सरकार. (जातात).

**सुभेदार मल्हारराव.**—राणाजी, दूतांकडून तुम्ही माहिती ठेवलीच असेल. शत्रूंची परिस्थिति काय आहे? त्यांचें सैन्य किती व तयारी कशी आहे, तसेंच तुमची स्वतःची तयारी काय आहे? जरा थोडी माहिती द्याल तर बरें होईल!

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—काकासाहेब, शत्रुसेना जयपूरच्या हद्दीवर येऊन ठेपली आहे. मेवाडची फौज पन्नास हजार आहे. माधवसिंहजीची आमच्या बंधूंची खास फौज पंधरा हजार आहे. शिवाय बुंदी दहा हजार व कोटा दहा हजार, अशा फौजा चढाईच्या तयारीनें आहेत. आमची फौज पंचवीस हजार आहे. आपण त्यांना तोंड देण्यास एक दोन दिवसांत चालून गेलों तर राजमहाल मुक्कामीं त्यांना आपण गाठूं शकतों. समजा तयारीला एक दोन दिवस लागले, तरीसुद्धां शत्रु फार चालून येणार नाहीं.

**सुभेदार मल्हारराव.**—आमच्या दोघांच्या फौजा पंचवीस-पंचवीस हजार आहेत. आधवराव दहा हजार व पवार पांच हजार. एकंदर आमचें सैन्य पासष्ट हजार होत आहे. आतां बोला तुमची

फौज मागें ठेवतां कीं अघाडीवर पाठवितां ? सैन्य राखून ठेवण्याची आवश्यकता असते. वेळप्रसंग आहे. कोणत्या वेळीं अधिक फौजेची जरूरी लागेल त्याचा नियम नाहीं.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—आमची निम्मी फौज आपल्या फौजेबरोबर जाईल व बाकी राजधानींत राहील. आपल्यांतील जे कोणी सेनापति राहतील त्यांच्या हुकुमतींत ती राहील. मला वाटलें तर मी लढाईवर येईन, नाहींतर तुम्ही मंडळी आहांतच.

**खंडेराव.**—सेनापति अप्पांना नाहीं तर काकांना करा. आमचें काम फक्त रुपये मोजून द्यावयाचें !

**सुभेदार मल्हारराव.**—खंडेराव, काय बडबड लावली आहेस ! अप्पा, तुम्हींच आमचे सेनानी. माझ्या फौजेचें आधिपत्य खंडेरावाकडे राहील. मी तशी देखरेख करीनच. मुख्य भार मात्र तुझ्यावर राहील. (रामचंद्रबाबा येतात).

**राजे जयाजीराव.**—ठीक आहे. आपल्या इच्छेप्रमाणेंच मी वागेन. बाबा, झाली कां तयारी ?

**रामचंद्रबाबा.**—होय सरकार. पानें मांडून तयार आहेत. मंडळी उठण्याचाच उशीर आहे.

**राजे जयाजीराव.**—राणाजी, काका, भैय्या, चला. हरगोविंदजी आपणही चला. आज सर्वजण इथें भोजन करूनच उद्योगास लागूं. चला राणाजी !

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—चला राजे. या मंडळी. (सर्व जातात).

---

## अंक पहिला

### प्रवेश ३ रा

( राजमहाल गांवाजवळची होळकरांची छावणी. श्री० अहिल्याबाई व दासी बोलत बसल्या आहेत ).

**अहिल्याबाई.**—हिरा, तूं भावोजींना भेटून आलीस ? काय बातमी आहे ?

**हिरा.**—सरकार, कालच्या युद्धांत शत्रूचा पूर्ण मोड झाला. मेवाडचा राणा जगतसिंहजी व कोटयाचा राणा जालिमसिंहजी दोघेही सैन्यासह आपआपल्या ठिकाणीं पळून गेले. माधवसिंहजी व बुंदीचा राणा कैद करून आणले आहेत. महाराज म्हणत होते कीं आपणाला या राजमहालच्या लढाईंत पूर्ण यश मिळालं.

**अहिल्याबाई.**—बरं झालं बाई ! मोठी काळजीची वेळ होती. मामंजी म्हणतात राजपूत फार पराक्रमी. त्यांच्याशीं लढणं म्हणजे विस्तवाशीं खेळणं आहे ! हिरा, भावोजींनीं खूप पराक्रम गाजविला असेल नाहीं ? सेनापतित्व त्यांच्याकडेच होतं ?

**हिरा.**—होय बाईसाहेब, सर्वजण त्यांच्या पराक्रमाची तारीफ करीत आहेत. ज्याच्या त्याच्या तोंडीं जयाजीमहाराजांचंच नांव ऐकूं येत आहे. राजपुतांचं सैन्य अगदीं किल्ल्याच्या तटाप्रमाणं अभंग होतं, पण महाराजांनीं हुजरातीच्या निवडक शिलेदारांसह असा हल्ला केला कीं राजपूत सैन्याची फळी फुटून त्याची दाणादाण झाली. (मल्हारराव येतात) मोठ्या सरकारांनीं तर समक्ष युद्ध पाहिलं आहे. ते आपणांस चांगल्या रीतीनं माहिती सांगतील.

**सुभेदार मल्हारराव.**—होय मुली, कालच्या युद्धांत मराठ्यांनीं जिवाची तमा न धरतां युद्ध केलें ! शाबास माझ्या जयाप्पाची ! खरे अर्जुन शोभतात आम्हां मराठ्यांचे ! मी त्यांना सेनापतित्व दिलें त्याचें त्यांनीं सार्थक केलें ! कालच्या युद्धांत राजपुतांशीं टक्कर असल्यानें व त्यांचा जमाव फार मोठा असल्यानें मोठी काळजी वाटत होती. मराठा वीरांनीं खरोखरच अगदीं शिकस्त केली !

**अहिल्याबाई.**—मामंजी, मग आतां युद्ध तर आटोपलंच म्हणावयाचं ! पुढची व्यवस्था काय केलीत ! माळव्याकडे आपला मुक्काम कधीं जावयाचा ?

**सुभेदार मल्हारराव.**—मुली, बुंदीच्या राण्याकडून मोठी खंडणी घेऊन त्याला सोडून दिलें. मेवाड व कोटा येथील राणे हातीं लागले नाहींत. मुख्य शत्रु माधवसिंह त्याला जयाप्पानें मोठ्या शिताफीनें पकडून आणलें आहे. मेवाडचा राणा पळाला पण त्यानें वकील पाठवून माफी मागितली व विनंति केली कीं ईश्वरसिंहजी व माधवसिंहजी हे दोघेही सवाई जयसिंहजींचे पुत्र. तेव्हां दोघां-नाहीं सांभाळण्याचें काम वडिलांचें आहे. मलाही त्याचें म्हणणें पटलें. मला माधवसिंहजीची दया आली. त्याला मी आपल्या ताब्यांत घेतला आहे. मेवाडचा रामपुरा परगणा त्याच्या खर्चाकरितां राहील व त्याची सर्व देखरेख आपल्याकडे रहाणार आहे. शिवाय ईश्वरसिंहजींनीं त्यास सालीना तीन लाख पये द्यावयाचे आहेत. ईश्वरसिंहजीनें आपली नजराण्याची अर्धी रक्कम कालच भरली. एक दोन दिवसांत आपण माधवसिंहजींसह रामपुरा परगण्यांत जाऊं व तेथील नीट व्यवस्था लावून त्यास तेथेंच ेवूं.

**अहिल्याबाई.**—एकंदरींत सध्यां तरी हें जयपुरप्रकरण थोडक्यांत निपटलं म्हणावयाचं ! बरं, भावोजी उज्जैनला किंवा बुंदेलखंडांत जाणार, कां आपणाबरोबरच रामपुरा परगण्यांत येणार ?

**सुभेदार मल्हारराव.**—ईश्वरसिंहजींचा व त्याचा लोभ अधिक जडला आहे. पुरता पाहुण-चार केल्याशिवाय तो अप्पाला जाऊं देणार नाहीं. म्हणून निश्चित कांहीं ठरलें नाहीं. (खंडेराव व माधवसिंहजी येतात).

**खंडेराव.**—भैय्या माधवसिंहजी ही आमची अहिल्याबाई ! फार गुणी आहे बरें कां ! धार्मिक तर फारच आहे. त्याचप्रमाणें राज्यकारभार व व्यवहार यांतही फार हुषार आहे. काकांची ती फार लाडकी आहे.

**अहिल्याबाई.**—(लाजून) उगीच माणसानं आपली स्तुति करीत सुटावं ! मी आपली साधीभोळी आहे हो ! मला राजकारण वगैरे कांहीं कळत नाहीं.

**माधवसिंहजी.**—नमस्कार वहिनी. भैय्या व मी आतां पगडभाई झालों आहोंत ! काकासाहेब आम्हां दोघांचा सांभाळ करणारे आहेत. आपणही मला आपल्या घरांतीलच समजा ! मी आतां आपला शत्रु नाहीं. माझा सर्व भरवसा काकासाहेब व आमचे भैय्यासाहेब यांच्यावर आहे. हरघडी मला आपलीही मदत लागणार आहे. मी अनाथ झालों आहे व तुम्हांला शरण आलों आहे. आतां तुम्हींच माझी देखरेख करून हित करणारे आहांत !

**अहिल्याबाई.**—आमच्या पुरुषांनीं जर आपणांस आपलं म्हटलं तर आम्हां बायकांना काय ? पुरुष सांगतील तसंच वागावयाचं ! माझ्याकडून जेवढं होण्यासारखं आहे तेवढं मी आपल्याकरितां अवश्य करीन.

**माधवसिंहजी**.—आपल्याकडून मला हीच आशा होती व आहे. मीही आपल्या शद्बाच्या बाहेर जाणार नाहीं. भैय्या सांगत होता तसेच आपले गुण आहेत. आपण साध्वी आहांत. आपल्या संगतींत माझें खास कल्याण होईल !

**खंडेराव**.—हिची एक गोष्ट फार वाईट आहे. त्या जयाप्पावर हिची फार श्रद्धा आहे. दोघां दीरभावजयींचं असें जमतें कीं कांहीं विचारूं नका. त्याचा स्वभाव मला मुळींच आवडत नाहीं ! पण आमचे काकासाहेब व ही आमची अहिल्या त्याला जिवापलीकडे प्यार करतात. आमची गणना ठरलेलीच—मूर्ख, बावळट, उतावळा.

**अहिल्याबाई**.—माणसानं परक्या माणसादेखत उगीच कांहींतरी बडबडत बसावं हें चांगलं कां ? जेव्हां पहावं तेव्हां भावोजींची कागाळी ! त्यांच्या नखाचीही सर यावयाची नाहीं तुम्हांला ? मामंजी त्यांची योग्यता जाणतात म्हणूनच त्यांच्यावर प्रेम करतात. मलाही म्हणूनच त्यांच्या-बद्दल मोठा आदर वाटतो. यांत कोणती शंका वाटते आपणाला! व न आवडण्यासारखं काय आहे ?

**खंडेराव**.—पाहिलंस कशी चिडली ! काका, हा सगळा तुमचा लाड. तिला शेफारून ठेविलेंत व मला अज्ञान म्हणून म्हणून पंगू बनविलेंत ! मला कंटाळा आला तुम्हां सर्वांचा ! मी व भैय्या माधवसिंहजी आतां कुठंतरी जातों व आनंदांत राहतों. सांभाळा आपलें राज्य व हा राज्य-कारभार !

**सुभेदार मल्हारराव**.—खंडेराव, काय चालविली आहेस बडबड ! शुद्धीवर आहेस कां ? जयाप्पांवर आम्हीं प्रेम करतों तें त्यांच्या उत्तम गुणांमुळें करतों. तशी योग्यता अंगीं आणावयाचं सोडून त्यांच्याशीं स्पर्धा करीत बसतोस ! अरे, तूं सुभेदाराचा मुलगा म्हणून तुझ्या सर्व कागाळ्यांकडे लोक दुर्लक्ष करतात. दुसऱ्या कोणाचा असतास तर लोक तुझ्या तोंडावर थुंकले असते !

**माधवसिंहजी**.—काकासाहेब, भैय्याचा असा राग राग करूं नका. मी माझ्या संगतींत त्याला असा हुषार करतों कीं ज्याचें नांव तें ! नंतर मग आपण सर्वजण माझी तारीफ करूं लागाल. ! (एकी-कडे) असा बनवतों चढेलला कीं, होळकरांच्या राज्याचा नाशच झाला पाहिजे ! (उघड) वहिनी, तुम्हींही बिलकुल काळजी करूं नका. सर्व माझ्यावर सोंपवून द्या !

**अहिल्याबाई**:—(स्वगत) हा मनुष्य कांहीं मला ठीक दिसत नाहीं. त्याचं वर्तन चांगलं असेल असं त्याच्या एकंदर वागणुकीवरून दिसत नाहीं. आई--कुलस्वामिनी ! त्याच्या संगतीपासून माझ्या पतिराजांना वाचव. (उघड) आपण नवखे आहांत. आपला स्वभाव आम्हांला माहीत नाहीं. आमचे आपले भोळे शंकर आहेत ! उलट त्यांच्याकडून आपणांस त्रास होईल. म्हणून शक्य तितके आपण त्यांच्यापासून दूरच असा !

**सुभेदार मल्हारराव**.—खरेंच माधवसिंहजी, तूं त्याला आपल्या संगतींत ओढूं नको. तो आहे बावळट व मूर्ख. उगीच तुला त्रास होईल !

**खंडेराव**.—खरेंच भैय्या, मी आपला आहे तसाच राहूं इच्छितों ! काका व ह्यादेखील तशीच इच्छा करतात ! ठीक आहे, तूं आपलें स्वतःचें हित पहा ! ईश्वर आहे माझ्या पाठीशीं ! (राजे जयाजीराव येतात ! ) या अप्पा, तुमचीच कमतरता होती· तुम्हींही कांहीं उपदेशाचे दोन वळसे देत असाल तर पहा !

**राजे जयाजीराव**.—भैय्या, काय गडबड आहे ? कसला वाद चालला आहे ? आणि तोही परकी पाहुण्यांच्या देखत ! वहिनी, भैय्या कां वैतागून राहिले आहेत ?

**अहिल्याबाई**.—भावोजी, इकडचा स्वभाव तुम्हांला माहीत आहेच. त्यांना आपलं कांहीं तरी कारण लागतं दुसरं कांहीं नाहीं.

**खंडेराव**.—आतां कशा गुलगुल गोष्टी व्हावयास लागल्या ! माझें जेवढें तेवढें वाकडें. अप्पावर मोठी श्रद्धा ! मोठी भक्ति ! जसा कांहीं प्रत्यक्ष देवच !

**अहिल्याबाई**.—त्यांचे थोडेंतरी गुण अंगीं आणण्याचा प्रयत्न करा. गुणांच्या बाबतींत चढाओढ करण्याची सोडून तुम्हीं आपले मत्सरांतच लोळत असतां. मराठेशाहीच्या हिताकरितां नेहमीं तळहातावर शिर घेऊन वाटेल तो त्याग करावयास ते तयार असतात. तुम्हांला मानापमाना-पलीकडे किंवा स्वार्थ साधण्यापलीकडे व पैसा मिळविण्यापलीकडे कांहीं तरी दिसतं कां ! भावोजींची बरोबरी करावयाला सात जन्म घ्यावयास पाहिजेत ! जरा आपल्या वडिलांकडं तरी पहा ! त्यांची केवढी कीर्ति, केवढा पराक्रम, केवढा मुत्सद्दीपणा ! ह्यांतील थोडा गुण तरी तुमच्यांत आहे कां ? सदा संशयानं व मत्सरानं जळत असतां झालं. उगीच आपलं माणसांनीं गप्प बसावं, तर अधिकच !

**खंडेराव**.—परक्या माणसादेखत नवऱ्याचा अपमान करीत आहेस. तोंड सांभाळ. काका, हा तुमचा सगळा लाड बरें कां ! आतां माझी अब्रू काय राहिली ?

**सुभेदार मल्हारराव**.—मुलगी काय वाईट सांगत आहे ? चांगले गुण अंगीं आणावे हें सांगणें काय पाप आहे ? यांत कसला अपमान ? उलट ती आपले कर्तव्यच बजावीत आहे. खंडेराव, इतके वेळां तुला समजाविलें पण तुझा स्वभाव कांहीं बदलत नाहीं. हळुहळू अंगीं उत्तम गुण आण-ण्याची तरी खटपट करावीस कीं नाहीं ?

**खंडेराव**.—काका, तुम्हां दोघांचा उपदेश ऐकून तेल्याच्या कपड्यासारखें माझें मन आतां अगदीं मळकटून गेलें आहे. मी प्रवाहपतित आहे. जिकडे वाहवेल तिकडे वाहवेल. मला आपले संसारांत सुख नाहीं, एवढें खास ! माधवसिंहजी चला. आपण थोडें गांवांतून फिरून येऊं. माझें डोकें दुखूं लागलें आहे. गांवांत हिंडण्यानें जरा बरें वाटेल !

**माधवसिंहजी**.—हो, मलाही तिकडे जावयाचें आहेच. जरा थोडा फेरफटका करून आल्यानें बरें वाटेल. राजे, तुम्हीं येत असाल तर पहा. तुम्हांला राजमहाल गांवचीं मौजेचीं ठिकाणें फिरून दाखवितों !

**राजे जयाजीराव**.—माधवसिंहजी, माझें काकाशीं थोडें जरूरी काम आहे. तुम्हीं व भैय्या दोघे जाऊन फिरून या ! मात्र भैय्याला चांगला संभाळा. तो आहे आपला भोळसर !

**खंडेराव**.—बस्स ! आमच्या पदव्यांचा उच्चार होऊं लागला. आतां येथून पळ काढला पाहिजे. माधवसिंहजी चला आपण जाऊं. त्यांना पाहूं द्या राजकारण. (दोघे जातात).

**अहिल्याबाई**.—भावोजी, हा मनुष्य मला ठीक दिसत नाहीं. घातकी दिसतो आहे. इकडच्या स्वारीला जरा सांभाळलं पाहिजे. विनाकारण कांहीं घोटाळे उत्पन्न करून आपला कार्यनाश करा-वयाचा ! मराठेशाही सध्यां मोठ्या पेंचांत आहे. मामंजींच्या पाठीमागें होळकरशाहीचं कसं होईल याची चिंता मला सारखी लागते ! आमच्या स्वारीला शत्रु फसवायला कमी करणार नाहीं !

**राजे जयाजीराव**.—वहिनी, त्याची काळजी करूं नका. मी सर्व गोष्टी बारकाईनें पहात आहे! काकाही सर्व परिस्थिति पाहून आहेत. सध्यां कांहीं काळजीचें कारण नाहीं. भैय्याचा स्वभाव थोडा लहरी आहे इतकेंच !

**सुभेदार मल्हारराव.**—मुली, तूं काळजी करूं नको. ह्या म्हाताऱ्याच्या प्राणांत प्राण आहे तोंपर्यंत तुला कांहीं कमी पडावयाचें नाहीं. होळकरशाहीची देखभाल करणारा हा म्हातारा फार सावध आहे. माधवसिंहजीसारखीं अनेक पोरें आम्ही खेळविलीं आहेत. तो आमच्यावर काय मात करूं शकतो.

**राजे जयाजीराव.**—बरं काका, आतां माधसिंहजींचें आपण काय ठरवितां ? मला वाटतें हे दोन्ही भाऊ दूर दूर ठेवावयास पाहिजेत. राजकारणाच्या दृष्टीनें ते एकत्र असणें योग्य नाहीं. आपलें काय मत आहे ?

**सुभेदार मल्हारराव.**—मी ह्या बाबतींत विचार करून ठेविला आहे. रामपुरा परगणा इंदोरला लागून आहे. त्या परगण्यांत माधवसिंहजीस ठेवावें. आम्हीं कधीं इंदोर कधीं रामपुरा इकडे फिरून त्याच्यावर नजर ठेवावी. ईश्वरसिंहजींकडे तुम्हीं रहावें. त्यांना महाराणा पद दिलें आहे, त्याबद्दल बादशहाची संमति आणवून दिल्लीपतीची सरदारकी वडिलांप्रमाणें त्यास मिळवून दिली पाहिजे. शिवाय श्रीछत्रपतींची व पेशवे ह्यांची ह्या कार्यास संमति मिळवून ठेविली पाहिजे ! जयपुरवाल्यास दुसऱ्या कोणाचा दुजोरा मिळतां कामा नये, नाहींतर मराठ्यांना तो दूर झुगारून देईल. म्हणून आतां विशेष काळजी घेतली पाहिजे.

**राजे जयाजीराव.**—हो असेंच करूं. तुमचें धोरण मला बिलकुल पसंत आहे. मीही मधून मधून उज्जैन, मंदोसर व जयपुर असे मुक्काम ठेवितों व राज्यव्यवस्था उत्तम बनवितों. वहिनी, आज फारच उदास दिसतां ? आनंदी आनंद मानावयाचा सोडून उदास कां झालां आहांत ?

**अहिल्याबाई.**—भावोजी, आपल्या या राजकारणाच्या नाटकास आतां कुठं सुरवात झाली आहे असं मला वाटतं. पहिल्या विजयानं हुरळून न जातां पुढील सर्व आपत्तींकडं नजर ठेविली पाहिजे ! मला तरी पुढील दिवस फार बिकट दिसत आहेत.

**सुभेदार मल्हारराव.**—मुली, तुझ्या म्हणण्याप्रमाणें ही स्वारीची सुरवात आहे. अनेक गुंतागुंतीचे प्रश्न उत्पन्न होऊन काय होईल तें कांहीं आज सांगतां येत नाहीं.

**राजे जयाजीराव.**—काका, वहिनी, हिंदुपदपातशाहीचें ध्येय आपणांस पुरें करावयाचें आहे. आपलें ध्येय जरी दूर असलें तरी निश्चित आहे. शिवछत्रपति किंवा शाहू छत्रपति ह्यांनीं ह्या हिंदवी स्वराज्यासाठीं किती तरी व्याप उचलले आहेत ? बाबानीं उत्तरेकडे कशा प्रकारचे कष्ट उचलले हें समक्ष पहाणारे तुम्ही आम्ही त्या ध्येयास कसे विसरूं ? आपण सर्वांनीं सतत सावध राहून कष्ट करीत राहिल्यावर आतां पल्ला फारसा दूर नाहीं. आपल्या राजकारणाचा व्याप वाढत आहे. माळवा, बुंदेलखंड, राजपुताना आज आपल्या हातांत आहेत. अंतर्वेदी व पंजाब ताब्यांत आला कीं आपलें हिंदवी स्वराज्य स्थापन झालेंच म्हणून समजावें. आजही दिल्लीच्या बादशहाला प्रत्येक घटकेला आमची मदत लागत आहे. कदाचित् एकदोन वर्षांत तो आपल्या हातचें पूर्णपणें बाहुलें बनेल, कारण तेथेंही मुसलमानांत तंटे असून प्रत्येकाला कोणाची तरी मदत पाहिजेच आहे.

**अहिल्याबाई.**—भावोजी, आपलं ध्येय आपण गाठीत आणलं आहे हें मला पटतं. पण दुसऱ्याच्या भांडणाचा जसा आपण फायदा घेत आहोंत, उद्यां तसाच प्रकार आपल्या बाबतींत होऊं नये. आमचीं मनं बिघडलीं आहेत असा शत्रूंना नुसता वास जरी आला तरी ते त्याचा फायदा घेतल्याशिवाय रहाणार नाहींत !

सुभेदार मल्हारराव.—मुली, ही गोष्ट खरी आहे. आजवर तर आमच्यांत कलह माजला नाहीं. पण मला त्या तरुण पेशव्याची विशेष धास्ती वाटते. तो आमच्यांत ऐक्य नांदू देण्याच्या ऐवजीं आमच्यांत फूट पाडून त्याचा फायदा घेण्याचा प्रयत्न करील. शिंदे होळकर एकदिलाचे आहेत हें त्यांस माहीत आहे. त्यांचें ऐक्य राहिल्यानें उत्तरेकडे मोठी शक्ति निर्माण होईल व सातारा दरबारचें कांहीं चालणार नाहीं. हें तो जाणून आहे. त्यानेंही स्वतः पुण्यास वस्ती करून तीच राजधानी करण्याचा प्रयत्न चालविला आहे. उद्यां पेशवे पुणें दरबार बनवून साताऱ्यास मागें टाकण्याचा फार संभव आहे. आमच्यावर छत्रपतींची हुकूमत राहण्याऐवजीं पेशव्यांची हुकूमत चालण्याचा काळ आतां जवळ आल्यासारखा दिसतो. बाबूजी नाईक त्याचे नातेवाईक असूनही त्याची त्यानें पूर्ण विल्हेवाट लाविली. नागपुरकर रघोजी भोंसल्यांच्या बाबतींत तो सारखा जळत असून त्याच्या पाठीमागें त्यानें ससेमिरा चालू ठेविला आहे. रघोजीनें स्वपराक्रमानें नागपूर, बिहार, ओरिसा व बंगालचा अर्धा भाग जिंकला आहे, व मराठ्यांची सत्ता कितीतरी वाढविली आहे. तो स्वतंत्र असतां त्याला पेशवे त्रास देऊन राहिले आहेत. आमच्यांतही फूट पाडण्याचे त्यांचे प्रयत्न चालू आहेत. मुली, तूंच पहा. मुतालकी मला देण्याच्या ऐवजीं माझ्या जयाप्पांना दिली. इथं दुसरा कोणी असता तर लागलीच भांडला असता; पण मी विचार केला कीं अप्पाही कोणी परका नाहीं!

अहिल्याबाई.—मामंजी, मला वाटतं ही वादळापूर्वीची भीषण शांतता आहे!

राजे जयाजीराव.—वहिनी, तुम्हांला धास्ती वाटते ती बरोबर आहे. माणसें मोहाला बळी पडून ज्या गोष्टी करूं नयेत त्या करतात त्यांचीं फळें मात्र त्यांच्या मुलालेंकरांना भोगावी लागतात. समजा आमच्यांत ऐक्य राहिलें नाहीं तर त्याचा परिणाम लागलीच जाणवला जाणार नाहीं. शेवटीं त्याचीं कडू फळें मात्र येतीलच. काका, माझी आपल्याला व भैय्याला हीच विनंति आहे कीं शिंदे-होळकरांचें जुग फुटूं देऊं नका.

सुभेदार मल्हारराव.—अप्पा, तुम्हीं कांहीं काळजी करूं नका. मत्सररूपी राक्षस ह्या म्हाताऱ्याच्या डोक्यांत थैमान करूं लागतो पण त्याला मी सारखा ताब्यांत ठेवतों आहे. मात्र छत्रपतींनीं व पेशव्यांनीं असें करावयास नको होतें!

राजे जयाजीराव.—काका, मी स्वतः तुम्हांस ते अधिकार द्यावयास एका पायावर तयार आहे हें मी कितीतरी वेळां आपणांस सांगितलें आहे. आपण मुतालीक नसतांही मी प्रत्येक गोष्ट आपणांस विचारून करीत आहे. ह्यावरून मला आपल्या ऐक्याबद्दल किती आदर आहे हें आपल्या ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं. दुसऱ्यांनीं वाटेल ते प्रयत्न केले तरी आपण ऐक्य बिघडूं द्यावयाचें नाहीं. आपणांस राष्ट्रकार्य साधावयाचें आहे. स्वार्थी बनावयाचें नाहीं. देशसेवकांनीं स्वार्थावर नजर ठेऊन चालत नाहीं. जयपुरप्रकरणांतील नजराणासुद्धां मी स्वीकारला नाहीं. त्यावरून माझ्या मनाची आपणांस कल्पना येईलच. मी स्वतः! आपल्या राष्ट्राकरितां वाटेल तो त्याग करावयास तयार आहे. काका, आपण माझ्या हृदयाची पारख करा व तसेच वागा.

अहिल्याबाई.—खरं म्हणतात भावोजी. मामंजी, तुम्हीच जरा सांभाळून वागा; अशी माझी पण आपणांस विनंति आहे.

सुभेदार मल्हारराव.—मुली, मी सर्व जाणतों. कंठास येईपर्यंत तरी हें जुग फुटावयाचें नाहीं मग पुढचें पुढें! देवाजवळ हीच प्रार्थना करीत रहावयाचें आहे. (विद्याधर घाईनें येतो व मुजरा करून उभा राहतो). काय विद्याधर, काय खबर आहे?

**विद्याधर**.—सरकार, महाराणाजी आपल्या भेटीस येत आहेत. आपणांस कळविण्या-करितां मला पुढें पाठविलें आहे.

**सुभेदार मल्हारराव**.—बरें तुम्हीं परत जाऊन त्यांना आंत घेऊन या. आम्हींही त्यांच्या स्वागताची तयारी करतों. मुली, तुम्हीं अत्तरपान वगैरेची व्यवस्था करा.

**विद्याधर**.—सरकार, मी जातों व महाराणाजींना घेऊन येतों. (विद्याधर मुजरा करून जातो).

**अहिल्याबाई**.—मामंजी, फराळाची वगैरे व्यवस्था करावयाची, कां नुसतंच अत्तरपान ?

**सुभेदार मल्हारराव**.—अप्पा, तुमचें काय मत आहे ? मला वाटतें नुसती अत्तरपानाची तयारी करावी.

**राजे जयाजीराव**.—वहिनी, ही थोडी धांदलीची वेळ आहे. नुसता अत्तरपानाचा बेत करा म्हणजे झालें. महाराणाजीही कांहींतरी निकडीचा निरोप घेऊन आले असतील.

**अहिल्याबाई**.—बरं तर, मी सर्व तयारी करून ठेवतें. जरूर असेल तेव्हां माणसाकडून कळवा. मी जातें. (नमस्कार करून आंत जाते).

**सुभेदार मल्हारराव**.—अप्पा, महाराणाजी पुढील व्यवस्थेसंबंधीं बोलण्याकरितांच आले असतील.

**राजे जयाजीराव**.—होय मलाही असेंच वाटतें.(विद्याधर व ईश्वरसिंहजी येतात. सुभेदार व राजे उठून राणाजींचें स्वागत करून त्यांना बैठकीवर बसवितात. नंतर सर्वजण बसतात).

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—काकासाहेब, भैय्या मी आपले आभार मानण्याकरितां आत्तां मुद्दाम आलों आहे. तुम्हीं दोघांनीं मदत करून महाराणाजीपद प्राप्त करून दिलें याबद्दल मी आपला जन्माचा ऋणी झालों आहे. आपणा दोघांचा मी कसा उतराई होऊं हें मला समजत नाहीं.

**राजे जयाजीराव**.—राणाजी, आम्हीं आपलें कर्तव्य केलें. आपल्या वडिलांचा व आमच्या वडिलांचा ऋणानुबंध फार मोठा होता. म्हणून आम्हांला आपण बोलावतांच यावें लागलें. पुढील धोरणाबद्दल काकांनीं विचार करून ठेविला आहे. तो तुम्हांलाही पसंत होईल असें मला वाटतें. काका, सांगा आपले विचार.

**सुभेदार मल्हारराव**.—राणाजी, आपण माधवसिंहजीस रामपुरा परगणा दिलाच आहे. शिवाय सालीना तीन लाख रुपये देणार आहांत. म्हणून माधवसिंहजींनीं रामपुरा येथें रहावें. तुम्हीं त्यांचे तीन लाख न चुकतां रामपुरा येथें हरसाल पोहोंचते करावे. माधवसिंहजींवर आमची देखरेख राहील. तुमचा व अप्पाचा स्नेह आहे, म्हणून ते आपल्या मदतीस राहतील. ज्या कांहीं घडामोडी करावयाच्या त्या अप्पांच्या सल्यानें तुम्हीं कराव्या. आहे कां हा विचार आपणांस पसंत ? जर आपणांस आणखी कांहीं विचारावयाचें असल्यास खुशाल विचारावें.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—काकासाहेब, आपले विचार मला मान्य आहेत, पण माधवसिंहजी फार उपद्व्यापी आहे. तो आपलें मन बिघडवून आपल्या सर्वांच्या स्नेहांत बिघाड आणील. त्यापेक्षां त्यास मेवाडच्या राणाजींकडेच पाठविलें असतें तर बरें झालें असतें. त्याचे तीन लाख रुपये व परगणाही मी तुम्हांस द्यावयास तयार आहे. माधवसिंहाची व्यवस्था मेवाडच्या राणाजींकडेच करावी.

**सुभेदार मल्हारराव.**—राणाजी, तोही सवाई जयसिंहाचाच पुत्र आहे ना? त्यास असें राज्याबाहेर काढून देणें तुम्हांलाच काळिमा आणणारें आहे. कल्पना करा आज त्याच्यावर प्रसंग आहे तोच प्रसंग तुमच्यावर असता तर तुम्हांलाही दयेची याचना करावी लागती. म्हणून ऐका. आम्हीं ठरवितों त्यासच तुमची संमति द्या व ही भाऊबंदकी इथल्या इथेंच मिटवून टाका. ही अशीच धुमसत राहिली तर जयपुरराज्याचें मोठें नुकसान करील. मला वाटतें आम्हीं ठरविलें आहे ह्यांतच माधवसिंहजीवर मोठा अन्याय केल्यासारखें आहे. वास्तविक राणाजी होण्याचा अधिकार पहिला त्याचा आहे. आतां प्रथम तुम्हांला आम्हीं वचन दिलें तें आम्हीं पाळावयास पाहिजे हें खरें.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—काकासाहेब, मी तुमच्या बाहेर नाहीं. आपण ठरविलेली व्यवस्था मला मंजूर आहे. विद्याधर, सर्व गोष्टी ध्यानांत ठेवा. कोणते करार करावयाचे ते मग लिहून काढून त्यावर प्रमुख मंडळींच्या सह्या घेऊं.

**विद्याधर.**—ठीक आहे हुजूर. आपली आज्ञा मान्य आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—दुसरी गोष्ट अशी कीं माधवसिंहजीस असें मोकळें फिरूं दिल्यास तो पळून जाईल व सैन्य जमवून पुनः आमच्यावर स्वारी करील. म्हणून त्यावर निदान नजर तरी ठेवावी!

**राजे जयाजीराव.**—राणाजी, त्याबद्दल आपण बिलकुल काळजी करूं नका. कारण त्याच्या-बरोबर भैय्या असून मराठा घोडेस्वारही आहेत. पळून जाण्याची त्याची शक्ति नाहीं. आमच्या सैन्याची त्याला कल्पना आहे. एवढें जबरदस्त धैर्य तो करणार नाहीं. सर्व जयपुरराज्यांत त्याची आतां नाचक्की झालेली आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—बरं तर. आतां सर्वांनींच हा विजयोत्सव साजरा करण्या-करितां जयपुरास चलावें अशी आमची आपणांस प्रार्थना आहे. चिंताकारक लढाईचा काळ संपला आहे. आतां चार दिवस जयपुरास घालवावे अशी विनंति करण्याकरितां मी आलों आहे.

**सुभेदार मल्हारराव.**—राणाजी, जयपुरला आमचें येणें होणार नाहीं. आम्हांला माधव-सिंहजीस बरोबर घेऊन जयपुरहद्दीपासून दूर जावयाचें आहे. तेंच आपल्याही हिताचें आहे. तुम्हीं अप्पास घेऊन जाऊं शकता. आमच्या येण्यानें फायद्याऐवजीं नुकसान होण्याचा फार संभव आहे. म्हणून आपण हा बेत बदला.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—आपणांला सोडून आम्हांला हा विजयोत्सव बरा लागणार नाहीं. त्यामुळें आपणा सर्वांस हजर राहतां येईल अशी कांहीं तजवीज काढा.

**राजे जयाजीराव.**—मला वाटतें, आतां लढाईचें काम तर संपलें आहे. मग इथेंच आठपंधरा दिवस अधिक राहून राणाजींच्या शद्बास मान द्यावा काकासाहेब, हा उत्सव इथेंच साजरा करूं, तोंपर्यंत सातारादरबार व दिल्लीदरबार इकडील जबाब येऊन जातील व दुधांत साखर मिळविल्या-प्रमाणें समारंभासही अधिक गोडी येईल.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—राजे, मला आपली योजना पसंत आहे. ठरलें, इथेंच उत्सव साजरा करावयाचा. एक महिना इथें मुक्काम टाकूं व जिकडे तिकडे आनंदी आनंद करूं. विद्याधर, महाराणी व चंद्रावती ह्या इथें आहेतच, बाकीच्या राण्यांना ताबडतोब बोलावणीं पाठवा. समारंभ साजरा करण्याकरितां जेवढी मंडळी व सामान तिकडून आणवावयाचें असेल तें सांडणीस्वार पाठवून

मागवून द्या. उत्सव फार मोठ्या प्रमाणांत साजरा झाला पाहिजे. काकासाहेब, ठरलें ना ह्याप्रमाणें ?

सुभेदार मल्हारराव.—तुम्हीं पडलां सगळी तरुण मंडळी ! तुमचा हिरमोड मी कशाला करूं ? तुम्हीं म्हणाल तर आम्हीं उत्सव संपेपर्यंत इथें छावणी करून राहूं व तुमच्या आनंदांत भाग घेऊं.

राजे जयाजीराव.—ठीक आहे. हाच बेत कायम. पूर्वीच्या या लढाईच्या छावण्या आतां विजयोत्सवाकरितां उपयोगी पडत आहेत, यासारखी आनंदाची गोष्ट कोणती आहे ? बरं काकासाहेब, राणाजींना अत्तरपान करा म्हणजे आम्हीं आपली रजा घेऊं.

सुभेदार मल्हारराव.—हिरा, अत्तरपानाचें घेऊन ये. म्हणजे अप्पा राणाजीस अत्तरपान करतील. (दासी सामान आणते. राजे व सुभेदार राणाजीस अत्तरपान करतात.)

राजे जयाजीराव.—बरं काकासाहेब, आम्हीं आतां येतों. मात्र माधवसिंहजींच्या बाबतींत सावध असा. राणाजी, चला तुमच्या छावणीपर्यंत आम्हींही आपणाबरोबर बोलत येतों. तेथून मग आम्हीं आपल्या छावणीकडे जाऊं.

महाराणा ईश्वरसिंहजी.—बरें, काकासाहेब येतों आम्हीं. आमचा मुजरा घ्या. राजे, चला. विद्याधर तुम्हीं पुढें जाऊन राजांच्या स्वागताची तयारी करा. जयपुरला सांडणीस्वार तांतडीनें पाठवा. उद्यांपासूनच उत्सवास सुरुवात झाली पाहिजे.

विद्याधर.—जी हुजूर, बंदा आज्ञेप्रमाणें सर्व व्यवस्था करील. (मुजरा करून जातो).

राजे जयाजीराव.—राणाजी चला. (दोघे जातात. पडदा पडतो).

---

## अंक दुसरा

### प्रवेश १ ला

(राजमहाल येथील ईश्वरसिंहजीच्या छावणीचा भाग, चंद्रावतीचा वाडा. चंद्रावती, शंकर मंहात व गणपत न्हावी बोलत बसले आहेत.)

**चंद्रावती.**—गणपत, अलीकडं राणाजी इकडं आले नाहींत. महाराणींच्या वाड्यांतच असतात असं वाटतं. मला वाटलं लढाईंत गुंतले असतील म्हणून फुरसत होत नसेल. तुला सर्व माहिती असते, जरा कळूं दे तरी.

**गणपत.**—बाईजी, खरें म्हटलें तर माझीसुद्धां आज तीनचार दिवसांत भेट झाली नाहीं. युद्धांत गुंतल्यामुळें राणाजींना फुरसत नव्हती.

**शंकर.**—बाईजी, महाराणींची बरीच काळजी असते तुम्हांला? अगदीं सवतिमत्सरच बाळगतां कीं तुम्हीं?

**चंद्रावती.**—शंकर, आमचं जीणंच असं विचित्र आहे, सर्वस्वी परावलंबी! आम्हीं विषय-वासनेचा बाजार मांडून बसतों. कोणालाही सचोटीचं व श्रीमंत गिऱ्हाईक मिळालं तर हवंच असतं. गणपत, राणाजी आले नाहींत म्हणून मला काळजी वाटली. त्याला कारणंही जबरदस्त आहेत. राणाजींच्या तीन राण्या, त्यांत महाराणी तर नेहमींच बरोबर असतात. आतां मला या तीघींच्या प्रेमावर विजय मिळवावयाचा असतो. तेव्हां सर्वांबद्दल मला काळजी ठेवावी लागते.

**गणपत.**—बाईजी, आम्हां गरीब लोकांचें आयुष्यच मोठें विचित्र असतें. आमच्यामध्यें कांहीं विशेष सामर्थ्य असल्यावांचून राणाजींसारखीं सावजें सांभाळतां येत नाहींत. आमच्या शंकरला तर हा नेहमींचाच अनुभव आहे म्हणा!

**शंकर.**—होय अनुभव तर आहेच. पण गड्या गणपत, राणाजींकडे जरा तुझें प्रस्थ अधिक आहे. तूं व चंद्रावती ह्यांनीं अशी पक्कड बसविली आहे कीं राणाजी इतर कोणाच्या ताब्यांत जाणें शक्यच नाहीं. म्हटलें जरा आम्हांलाही तुमच्या मैफलींत घेऊन आमचेंही थोडें स्मरण राहूं देत जा.

**चंद्रावती.**—हो, हो, शंकर! आमचीच स्तुति करून राहिला आहेस कीं अगदीं! जसं कांहीं राणाजींजवळ तुझं वजनच नाहीं. अरे बाबा तुम्हीं दोघे राणाजींचे जयविजय आहांत. राणाजी तुमच्या एका शद्बाबाहेर जात नाहींत हें मला कां माहींत नाहीं? उगीच आपली माझी स्तुती करून मोकळे होतां झालं.

**शंकर.**—बाईजी, आम्हीं जयविजय असलों तर तुम्हीं रंभा किंवा लक्ष्मी आहां असेंच म्हटलें पाहिजे. तुमचें वजन राणाजींजवळ फार आहे. आम्हीं गरीब माणसें तुमच्या साहाय्यानें कशीं तरी तरून राहिलों आहोंत.

**गणपत.**—असें करा, आतां वाद नको. आपण तिघेही एक आहोंत व राणाजी ही आपली शिकार आहे. सध्यां राणाजींला युद्धांत यश मिळालें असून त्यांच्या मागची माधवसिंहजी व त्यांचे पक्षपाती ह्यांची कटकट दूर झाली आहे. आतां राणाजी आनंदांत बेहोष राहतील. खरा हात मारण्याची हीच वेळ आहे! कां खरं कीं नाहीं बाईजी?

**चंद्रावती.**—गणपत, आतां खरी मौज आहे. आतां मोठा उत्सव झाल्यावांचून राहाणार नाहीं. अनेक राजेमहाराजे येतील ! खूप गाणींबजावणीं होतील. मग त्यांत इनामंही भरपूर मिळतील. तुम्हीं दोघे माझे जोडीदार असल्यावर अनेक राजेमहाराजांना मी नुसती बोटावर नाचवीन. तुम्हीं माझे खरेखुरे मदतगार सरदार आहांत.

**शंकर.**—तुम्हीं आमच्या विषयाच्या राज्यावर अभिषिक्त असलेल्या आमच्या महाराणी आहांत. ह्या महाराणीनें हुकूम सोडावे व आम्हीं ऐकावे. (बाहेरच्या बाजूस पहात) अरे गणपत हे दोन सरदार कोण चालले आहेत ? मला तर कोणी फार मोठें असावेत असें दिसतें.

**चंद्रावती.**—(बाहेर डोकावून पहात) खरंच गणपत. चांगले मोठे सरदार दिसतात. बघ कीं जरा चौकशी करून. तसंच कांहीं जबरदस्त कूळ असलं तर बघूं जरा हात मारून. तिघांचाही होईल फायदा.

**गणपत.**—बरें बाईजी पहातों. (बाहेर जातो).

**शंकर.**—बाईजी सावधगिरीनें बरें ! कदाचित् कोणी मराठ्यांकडील असतील व राणाजींना ही गोष्ट कळेल.

**चंद्रावती.**—तुम्हीं नका त्याची काळजी करूं. असं काम करूं कीं कुणासही पत्ता लागूं देणार नाहीं. (माधवसिंहजी व खंडेराव यांस गणपत घेऊन येतो. चंद्रावती उठून उभी राहते व माधवसिंहजीस ओळखते) यावं यावं, राणाजी ! यावं सरदारसाहेब ! गरीबावर अशी कां कठोर माया केली ! घराजवळ येऊन दर्शन दिल्याशिवाय तसंच जाणं बरं कां ? एवढी गरीबावर अवकृपा कां ? बसा असे लोडाशीं. अनेक वर्षांनीं आज भेटीचा योग आला आहे.

**माधवसिंहजी.**—चंद्रा, तूं आमच्या दादांची कलावंतीण. शिवाय तुझें घर इथें आहे अशी मला कल्पनाच नाहीं. बरें एखादे वेळीं दादांना ही गोष्ट कळली तर त्यांना मुळींच आवडणार नाहीं. चंद्रा, प्रख्यात होळकर राजपुत्र तुझ्यासमोर आहेत. हे माझे मित्र झाले असून त्यांचें नांव खंडेराव आहे. आम्हीं दोघेही सहज सहल करण्याकरितां बाहेर पडलों.

**चंद्रावती.**—माझं भाग्य थोर म्हणून आपणासारख्या राजबिंड्यांचं दर्शन आज मला झालं. आतां थोडी विश्रांति घ्या. थोडं गाणंबजावणं ऐकून मग जावयाचं ! रोज सवडीनुरूप एकदां तरी गरीबाकडे पायधूळ झाडावयाची. सवड असेल तेव्हां मी शंकरला किंवा गणपतला पाठवून आपणांस बोलावून घेईन. म्हणजे थोरल्या राणाजींची भीति राहणार नाहीं.

**खंडेराव.**—भैय्या, ह्या कोण आहेत. फार सुंदर असून चतुरही दिसतात ?

**माधवसिंहजी.**—भैय्या, आमच्या दादांची ही नायकीण आहे. मोठी चांगली आहे बघ ! रूपाप्रमाणें आवाज कसा कोकिळेसारखा मधुर आहे.

**चंद्रावती.**—(लाडिकपणानें) तसं कांहीं नाहीं हो राजपुत्र ! मी आपली गरीब दासी आहे. आपण माझी स्तुति करतां यांत मला मोठा आनंद व भूषण वाटत आहे. अशीच गरीबावर कृपा राहूं द्या. (घुटीचा पेला भरून देते).

**खंडेराव.**—छे, छे, हें काय आहे. वास येतो आहे. मी कधीं घुटी पीत नाहीं. ( पेला खालीं ठेवतो) भैय्या तूं घे, मला कधींच संवय नाहीं.

**माधवसिंहजी.**—अरे भैय्या, ही घुटी नाहीं. हें पृथ्वीवरील अमृत आहे व पेला भरून देणारी रंभा आहे. घे, एक तरी घेच. (पेला देतो).

**खंडेराव.**—छे बुवा, ही असली संवय आपणांस नको. (पेला घेतो) तुझा आग्रहच आहे म्हणून हा एकच व फक्त आजच मी घेईन. (पितो).

**माधवसिंहजी.**—चंद्रा, आणखी भरून दे. आज भैय्या व मी पुरती मजा लुटणार. कां खरें कीं नाहीं भैय्या.

**चंद्रावती.**—(पेले भरीत) शंकर, गणपत, जरा बाहेर राहून थोरल्या राणाजींच्याकडे लक्ष ठेवा. तोंपर्यंत मी या पाहुण्यांची सेवा करतें.

**शंकर.**—ठीक आहे. पण पाहुण्यांकडून बिदागी भरपूर घ्या बरें बाईजी. आपले पाहुणे राजपुत्र आहेत हें ध्यानांत ठेवा. चल गणपत. (दोघे जातात).

**चंद्रावती.**—(पेले देते) राया, आज किती दिवसांनीं हा योग आला आहे. आपण मला विसरला असाल पण मला आपली आठवण नेहमीं होत असते. आपण मेवाडांत गेल्यापासून मला हुरहुर वाटत होती. (लाडिकपणानें) आतां नाहीं मी आपल्याला सोडणार. महाराणाजी आतां माझ्याकडे फार दुर्लक्ष करतात. तिन्ही राण्यांच्याकडे त्यांचा ओढा आहे. म्हणून आपणच मला आपली दासी म्हणून ठेवा.

**माधवसिंहजी.**—भैय्या! घे, अमृताचा आणखी एक पेला घे. चंद्रा तुला आवडते कां? चंद्रा, माझ्या मित्राचें मनोरंजन कर. त्याचें सुख तें माझें सुख. शिवाय मी नजरकैदी आहे. एक परगणा व तीन लाख रुपये मला एक महिन्याला पुरणार नाहींत. मी तर महाराणा होऊं इच्छितों. माझा दोस्त मला महाराणा बनविणार आहे. मी जयपुरचा महाराणा होणार आहे. चंद्रा, तुला मी पट्टराणी बनवीन. भैय्या, चंद्रा कशी चंद्रासारखी आहे. हें अमृत कसें चांदण्यासारखें सुखकारक आहे! शीतल आहे! चंद्रा, तुझी कांती खऱ्या चंद्रासारखी शीतल व मोहक आहे.

**खंडेराव.**—खरंच भैय्या, घुटी कशी छान आहे. पेले भरून देणारे हातही मोहक आहेत. भैय्या, सुखाच्या नवीन प्रांतांत तूं माझा प्रवेश केलास. वा! मदिरा व मदिराक्षी ह्यांची मजा लुटण्यांत स्वर्गसुख असतें म्हणतात तें खरें आहे. वा! चंद्राबाई, तुम्ही सुंदर, मोहक, गवई असून दुसऱ्या अनेक गुणांनीं मंडित आहांत. फार मजा आहे. अहिल्येला म्हणावें बघ ही चंद्राबाई कशी चांगली आहे? असं सुख रोज मिळाल्यावर कशाची पर्वा आहे? राज्याची पर्वा नाहीं, काकांची पर्वा नाहीं, अहिल्येची पर्वा नाहीं, इतकेंच नव्हें तर माझीदेखील पर्वा नाहीं. भैय्या, आपणांला ही मजा पसंत आहे. तुला महाराणा बनवितों! मी तुला राणा बनवितों! तो अप्पा कोण होतो? त्याचें कोण ऐकतो. भैय्या, तूंच महाराणा हो! चंद्रावती, तूं महाराणी हो. आपण खूप मजा लुटूं. सदैव आनंदांत राहूं.

**माधवसिंहजी.**—भैय्या, आपण दोघे मिळून जयपुरची गादी मिळवूं. दादा व जयाप्पा आपलें कांहीं करूं शकत नाहींत. आपण मर्द आहोंत. स्वस्थ बसावयाचें नाहीं. लढाई करूं व जयपुरचें राज्य मिळवूं. (घाईनें गणपत येतो).

**चंद्रावती.**—गणपत, काय गडबड आहे?

**गणपत.**—(घाईनें) महाराणाजी व दुसरे कोणीतरी इकडे येत आहेत. हुशार व्हा व या मंडळींना वाटेला लावा.

**चंद्रावती.**—राणाजी, मागच्या खोलींत जाऊन बसा. महाराणाजी येत आहेत.

**माधवसिंहजी.**—ठीक आहे. भैय्या, चल आपण आंत जाऊं. आंतल्या खोल्यांत जाऊन आराम करूं.

**खंडेराव.**—चल भैय्या, पण घुटीही बरोबर घे. ( गणपत दोघांना आंत घेऊन आतो ).

**चंद्रावती.**—(बाहेर येऊन ताजीम देते) यावं, यावं महाराणाजी ! बरोबर पाहुणे कोण आहेत ?

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—चंद्रा, हे माझे मित्र राजे जयाजीराव शिंदे. ह्यांच्या मदतीनेंच ही लडाई मी जिंकली. हे माझे पगडबंधू आहेत. चंद्रा, गाणेंबजावणें वगैरें झालें पाहिजे. माझ्या मित्राची तबियत अगदीं खुष झाली पाहिजे.

**राजे जयाजीराव.**—राणाजी, ही काय गोष्ट आहे ? मला तुम्हीं कुठं आणलं आहे ? ही तुमची छावणी नव्हें कां ?

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—राजे, जयपुरच्या महाराणाजींचें हें विश्रांतिस्थान आहे. ही माझी आवडती चंद्रा ! बिचारी नायकीण असूनही पत्नीप्रमाणें प्रामाणिक राहून मजवर प्रेम करते. खरें कीं नाहीं शंकर ?

**शंकर**—हो हो सरकार. ह्या बाईजींपेक्षां महाराणी काय अधिक प्रेम करणार ? पहातां पहातां आमचे डोळे निवले. सरकार असलें अजब प्रेम आम्हीं कुठल्याही ठिकाणीं पाहिलें नाहीं. चला सरकार आंत चला. इथें बाहेर किती वेळ थांबावयाचें ! आंत जाऊन पाहुण्यांसह मजा लुटा.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—राजे, या आंत. आपण थोडें गाणेंबजावणें ऐकून मग परत जा !

**राजे जयाजीराव.**—(हंसत) महाराणाजी, तुम्हीं विद्याधरला ह्याच स्वागताची तयारी करण्यास पाठविलें काय ? अरेरे, तुम्हीं मला ओळखलें नाहीं ! मी वेश्या किंवा घुटी यापासून अगदीं अलिप्त रहात असतों. माफ करा. मी आपली रजा घेतों. मला माझ्या छावणींत तांतडीनें जावयाचें आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—पण आमची आपण निराशा करणार ? खरेंच आपणाला या गोष्टी आवडत नाहींत ? नुसतें गाणेंबजावणेंही ऐकण्यास आवडत नाहीं ?

**राजे जयाजीराव.**—छे भलतेंच. मला यापैकीं कांहींच आवडत नाहीं. बरें येतों मी. रामराम. (जाऊं लागतात).

**चंद्रावती.**—क्षमा मागतें मी आपली. या गरीबाच्या झोंपडीला पाय लागले असते तर मी पावन झालें असतें. महाराणाजी आमचे रोजचेच. पण आपल्यासारखे मोठे पाहुणे येऊन त्यांनीं उंबरठ्यांतूनच परत जावं हें हृदयाला किती तरी दुःख देणारं आहे. राजे मी आपल्या लायक नाहीं हें जाणतें, पण विनंतीपूर्वक आपल्या पाया पडतें. एक वेळ आंत येऊन या दासीला पावन करावं.

**राजे जयाजीराव.**—चंद्रावती, आम्हीं या ढंगांतील माणसें नव्हे. तुम्हीं आमच्या भानगडींत पडूं नये. आम्हांला असल्या गोष्टींचा भयंकर तिरस्कार आहे.

**चंद्रावती.**—आपल्यासारख्या कृष्ण भगवानांनीं आमच्यावर वरदहस्त ठेवला नाहीं तर आमचा उद्धार कसा व्हावा. मी नायकीण जरूर आहे, पण देवमाणूस कोण हें ताबडतोब ओळखतें. संतांच्या सहवासानं आमच्यासारख्या पाप्यांचा उद्धार सहज होतो.

**राजे जयाजीराव**—असली लाघवी व मायावी भाषणें आम्हांला कळतात. आमच्या सहवासाची इच्छा करण्यापेक्षां एखाद्या शंकराच्या मंदिरांत जाऊन निर्मळ मनानें पापाचें प्रायश्चित्त घे. शुद्ध मनानें तपश्चर्या केलीस, शिवाची भक्ति केलीस तर उद्धार व्हावयास कांहीं वेळ लागणार नाहीं ! आमच्यासारख्या मानवापाठीमागें लागून काय फायदा होणार ? दूर हो. जाऊं दे आम्हांला. यापुढें आमच्या नादीं लागूं नयेस. चला राणाजी. मी तसाच गेलों तर आपला कदाचित् अपमान होईल.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—छे, छे ! राजे, अशी कांहीं गोष्ट नाहीं. जी गोष्ट आपणांस आवडत नाहीं ती करा असें आम्हीं केव्हांही सांगणार नाहीं. तुमचा स्वभाव न जाणतां चुकून तुम्हांला आम्हीं इकडे आणलें. मी दिलगिरी प्रकट करून आपली माफी मागतों. राजे, माझ्यासंबंधीं मात्र गैरसमज करून घेऊं नका. राजेमंडळी विलासी असतात, या कल्पनेनें मी तुम्हांस इकडे आणलें. यापुढें असा कधींच प्रमाद घडावयाचा नाहीं, अशी मी आपणांस खात्री देतों.

**चंद्रावती.**—(पाया पडते) राजे ह्या दासीलाही क्षमा करा. मी कांहीं उणं अधिक बोललें असलें तर तें पोटांत घाला व गरीबावर दया करा.

**राजे जयाजीराव.**—तुम्हांला मी माफी देत आहे. चला राणाजी वेळ फार झाला आहे. (एका बाजूनें जाऊं लागतात तों समोरून बडबडत खंडेराव व माधवसिंहजी येतात).

**खंडेराव.**—कु ं गेला लेकाचा तो गणपत ? भैय्याला व मला डेऱ्यांत सोडून कुठं गेला. 'घुटी आणतों' म्हणून निघून गेला ! अजून पत्ता नाहीं लेकाचा ! चल भैय्या आपण त्याला धुंड.

**माधवसिंहजी.**—भैय्या चुप बैस. महाराणाजी व राजे जात आहेत.

**राजे जयाजीराव.**—(थांबून) अरे कोण ? खंडेराव ! माधवसिंहजी ! तुम्हीं घुटींत झिंगलेले ? काय गोष्ट आहे ही ? कांहीं तरी दगा दिसतो.

**चंद्रावती.**—थोडचा वेळापूर्वी राणाजी व हे गृहस्थ इथं आले व त्यांनीं पिण्याकरितां घुटी मागितली. मी त्यांना दिली. तेव्हांपासून असेच बडबडत फिरत आहेत. मी केव्हांपासून तरी त्यांनां इथं थांबण्याचं मना केलं पण ऐकतच नाहींत. बरं झालं आपण व महाराणाजी आलांत. आतां जातील एकदांचे !

**राजे जयाजीराव.**—माधवसिंहजी, खंडेराव, काय हें ? लाज नाहीं वाटत, एका वेश्येकडे घुटी पिऊन अशा प्रकारें क्षुद्रपणा दाखवीत आहांत ? जा ! खंडेराव, माधवसिंहजी, पहिले आपल्या छावणीत जा.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—शंकर, तूं असें कर ह्यांना होळकरांच्या छावणींत पोहोंचते कर. आम्हीं दोघे आमच्या डेऱ्याकडे जातों. जा यांना घेऊन.

**शंकर.**—जी सरकार. चला राणाजी, चला सरदारसाहेब.

**माधवसिंहजी.**—दादा सांगतात तर चला. खंडेराव चला आपल्या छावणींत जाऊं. (शंकर, माधवसिंहजी व खंडेराव जातात).

**राजे जयाजीराव.**—चंद्राबाई, खरी काय हकीकत आहे ती सांग. नाहींतर माझ्यासारखा कोणी वाईट नाहीं. शिक्षा करीन तर फार भयंकर करीन.

**चंद्रावती.**—राजे, खंडेराव कांहीं पिण्यास तयार नव्हते. पण राणाजींनीं त्यांना आग्रह करून पेल्यापाठीमागें पेले पाजिले. खंडेराव बिचारे भोळसर ! पण राणाजींनीं त्यांना फसविलं. राणाजी असल्यामुळं माझाही नाइलाज झाला.

**राजे जयाजीराव.**—मला वाटलेंच होतें असें कांहीं होईल म्हणून.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—चंद्रा, तूं प्रतिव्रता म्हणवितेस व असे ढंग करतेस. तुला लाज वाटावयास पाहिजे. तूं माझी असतांना अशा प्रकारें मुलांच्या नादानें वागून माझ्या तोंडाला मात्र काळिमा फासलास. तुला काय सजा द्यावी हेंच मला कळत नाहीं. पुनः असा उपद्व्याप जर तूं केलास तर मात्र मला खपणार नाहीं. आज ही तुला पहिली ताकीद आहे.

चंद्रावती.—(पाया पडते) देवा, असं माझ्यावर रागाऊं नका. सर्व गुन्हा माफ करा.

महाराणा ईश्वरसिंहजी.—बस कर बडबड. सांगितलें त्याप्रमाणें ऐक. (विद्याधर येतो) काय विद्याधर? स्वागताची तयारी झाली का?

विद्याधर.—हो केव्हांच झाली आहे. हुजूर, व्यवस्था मात्र महाराणीसाहेबांच्या डेऱ्यांत केली आहे. आपल्याकडून मी छावणीकडे जात असतां महाराणीसाहेबांच्या डेऱ्यावरून जात होतों. इतक्यांत त्यांनीं मला पाहिलें. दासीकडून बोलावून मला विचारलें तेव्हां त्यांना सांगितलें कीं राजे येत आहेत, त्यांच्या स्वागताची तयारी करण्यास महाराणाजींचा हुकूम झाला आहे. तेव्हां त्या म्हणाल्या मी जेवणाची तयारी करवितें. सर्वांना इकडेच भोजनास घेऊन ये. महाराणाजींना व राजांना माझ्यातर्फे विनंति करून जरूर घेऊन ये, असें त्यांनीं मला सांगितलें. तिथें सर्व व्यवस्था करूनच आपणांस बोलावण्यास मी इकडे आलों. आतां खाशा स्वाऱ्यांनीं महाराणीसाहेबांच्या विनंतीस जरूर मान द्यावा.

महाराणा ईश्वरसिंहजी.—भैय्या, महाराणी फार प्रेमळ आहेत. त्यांचें आमंत्रण नाकारतां येणार नाहीं. चला आज आपण तिथेंच भोजन करूं व महाराणींना आनंदित करूं. बिचाऱ्यांनीं मोठ्या श्रद्धेनें तुम्हांला आमंत्रण दिलें आहे.

राजे जयाजीराव.—महाराणी, शिवाय आमच्या वहिनी, ह्यांचें आमंत्रण कसें नाकारतां येईल. विद्याधर चला. महाराणींच्या आज्ञेप्रमाणें आम्हीं येतों. भैय्या, या चंद्रावतीचा बंदोबस्त चांगला झाला पाहिजे. खंडेराव व माधवसिंहजी यांना काबूंत ठेविलें पाहिजे. नाहींतर ते दुर्व्यसनी बनून मोठा घात होण्याचा संभव आहे. महाराणाजी, आजचें हें दृश्य पाहून माझें काळीज फाटलें आहे. पुढें काय परिस्थिति निर्माण होणार याबद्दल मला अतिशय चिन्ता वाटूं लागली आहे.

महाराणा ईश्वरसिंहजी.—राजे, आपण कांहीं काळजी करूं नका. चंद्राचा बंदोबस्त मी ताबडतोब करतो. काकासाहेबांच्याकडून या माधवसिंहजीवर व खंडेरावांवर चांगली नजर ठेवावी. अशी घुटी पिण्याची किंवा बाहेर भटकण्याची त्यांना संधि देतां कामा नये. आपण सर्वच सावध राहिल्यावर चिंतेचें कारण उरणार नाहीं. चंद्रा! खबरदार, यापुढें पुनः अशी वागलीस तर तुला हत्तीच्या पायाशीं बांधून ठार मारलें जाईल. समजलीस? माझ्याशीं अप्रामाणिकपणा केलास तर त्याबद्दल भयंकर प्रायश्चित्त घ्यावें लागेल!

चंद्रावती.—(पाया पडते) दया मायबाप. एक वेळ माफी करावी. असा गुन्हा पुनः होणार नाहीं. (डोळे मिचकावीत) शंकर, गणपत, मजजवळ नेहमींच असतात. तेच माझ्या प्रामाणिकपणास साक्ष आहेत. गणपत, खरें ना बाबा?

गणपत.—खरंच सरकार, बाईजी अगदीं गंगेसारख्या निर्मळ आहेत. आपण बाईजींबद्दल भलता संशय घेऊं नये. महाराणाजी, अहो त्या साध्वी आहेत साध्वी! त्यांच्या जोडीची स्त्री तुम्हांला दुनियेंत आढळणार नाहीं! त्यांच्यावर आपण बिलकुल नाराज होऊं नका.

महाराणा ईश्वरसिंहजी.—पुरें कर. तूंही फार खुषामतखोर आहेस! माझ्याशीं तुम्हीं सर्वांनीं प्रामाणिक राहिलें पाहिजे. नाहींतर एका एकास फांसावर चढवीन. ध्यानांत ठेवा. त्या शंकरलाही माझा निरोप सांग. बरें राजे, चला आपणांस फार वेळ झाला. आतां प्रथम भोजनास जाऊं या.

राजे जयाजीराव.—ठीक आहे. चला महाराणाजी. (सर्व जातात).

---

# अंक दुसरा.

## प्रवेश दुसरा.

(राजमहाल येथील राजे जयाजीराव यांची छावणी--रामचंद्रबाबा व सुभेदार मल्हारराव होळकर बैठकीवर बोलत बसले आहेत.)

**सुभेदार मल्हारराव.**--बाबा, अप्पा गेले कुठें? कांहीं माहीत आहे कां? खंडेराव व माधवसिंहजी मजकडे त्याच्या कागाळ्या करीत होते. महाराणा ईश्वरसिंहजींच्यासमोर त्या दोघांचा त्यांनीं अपमान केला. हें खरें असलें तर यांत होळकरांचा अपमान केला आहे. खंडेराव मूर्ख असला तरी तो सुभेदार होळकरांचा पुत्र आहे, एवढें अप्पांला समजावयास पाहिजे होतें. तो मुतालकी तोऱ्यांत तर आला नाहीं? माधवसिंहजी झाला तरी तोही राजपुत्र आहे. त्याचा अपमान करणें योग्य नव्हतें. जर त्या दोघांकडून कांहीं चूक झाली असेल तर त्याबद्दल त्यांना बोलायच्याऐवजीं मला सांगावयास पाहिजे होतें. बाबा, आतां हा अप्पांचा चढेलपणा आम्हीं किती दिवस सहन करावयाचा हें तुम्हींच सांगा. राणोजीबाबांच्या वेळचे ते दिवस गेले! आतां पोरकटपणा जिकडे तिकडे बोकाळला आहे!

**रामचंद्रबाबा.**--सुभेदार, तुम्हींआम्हीं आतां पिकलीं पानें. अशींच अनादरपूर्वक झडून जावयाचीं! त्याबद्दल इतके मनाला काय लागून घ्यावयाचें? कांहीं दिवस आपले; आतां त्यांचे आहेत! म्हणतातच कांहीं दिवस सासूचे व कांहीं दिवस सुनेचे. बरें, अप्पादेखील उगीच त्यांना बोलले नसतील. कांहींतरी जबरदस्त कारण घडलें असलें पाहिजे. ते आल्यानंतर सविस्तर कारण कळेल. तूर्त आपण संतापूं नये. त्यांना सर्व हकीकत विचारून घेतल्यानंतर मग दोष लावावा. कारणावांचून रागावणें योग्य होणार नाहीं.

**सुभेदार मल्हारराव**--ठीक आहे. तो आल्यानंतर कारण विचारतां येईल. बरें, बाबा! दक्षिणेकडील व दिल्लीकडील पत्रें आलीं काय?

**रामचंद्रबाबा.**--होय सुभेदार. श्री. छत्रपतींचें व नानांचें अशीं दोन्हीं पत्रें आलीं. त्यांनीं आपण ठरविलेल्या मनसुब्यास पूर्ण संमति दिली आहे. त्यांनीं दिल्लीच्या वजीरास व बादशहास पत्रें पाठवून त्यांच्याकडूनही जबाब मागविले. आमचीं पत्रेंही हिंगण्यांना गेली होतीं. दिल्लीदरबारनें ईश्वरसिंहजीस आपली सरदारकी दिली असून पंजाबांत मोंगल सरदारांबरोबर स्वारीवर जाण्याचीही आज्ञा दिली आहे. महाराणा व दिल्लीपतीचे सरदार म्हणून दिल्लीहून वस्त्रेंहीं आलीं आहेत. आतां आपण व अप्पा मोठा दरबार भरवून ईश्वरसिंहजीस तीं अर्पण करावीं व येथून आपला मुक्काम हलवावा. उत्सवांत अधिक राहून कालव्यय करूं नये.

**सुभेदार मल्हारराव.**--बाबा, बरोबर आहे तुमचें म्हणणें. इथें राहून वेळ दवडणें व सैन्याचा फाजील खर्च करणें योग्य नाहीं. दरबार भरवून वस्त्रें देण्याच्या पूर्वीं पहिलें ईश्वरसिंहजींकडून पांच लाख नजराणा वसूल करावयास हवा. एकदां वस्त्रें मिळाल्यावर तो नजराणा देण्यास टाळाटाळ केल्यावांचून राहणार नाहीं. खजीन्यांत भरपूर शिल्लक नसतांही तो या उत्सवांत विनाकारण पैसे उडवीत आहे. अप्पा त्याला प्रोत्साहन देत आहे. (राजे जयाप्पा येतात).

**राजे जयाजीराव.**--नमस्कार काकासाहेब. आपण केव्हां आलांत? फार वेळ तर झाला नाहीं ना? महाराणाजींनीं जरा जेवणाचा आग्रह केला म्हणून जाऊन आलों. बाबा, काय खबर आहे?

**रामचंद्रबाबा**.—दक्षिणचीं व दिल्लीचीं पत्रें आलीं. त्यांत आपण जें ईश्वरसिंहजीस हातीं धरलें आहे त्यास पूर्ण संमति आहे. इतकेंच नव्हें तर दिल्लीपतीकडून महाराणा व दिल्लीपतीचे सरदार म्हणून राणाजींकरितां बहुमानाचीं वस्त्रेंही तिकडून येऊन गेलीं. आतां दरबार भरवून तीं त्यांना अर्पण करावीं.

**राजे जयाजीराव**.—ठीक झालें. काकासाहेब आपल्या म्हणण्यास छत्रपति, पेशवे व बादशहा ह्या सर्वांची मान्यता मिळाली. आतां येथून मुक्काम हलविण्यास हरकत नाहीं. काका, तुम्हीं बोलत कां नाहीं? असे रागांत कां? मजकडून कांहीं अपराध घडला कां?

**सुभेदार मल्हारराव**.—अप्पा, मी तुम्हांला फार समजदार, शहाणा, असा समजत होतों पण तुम्ही आतां बेफामपणें वागूं लागलात. महाराणा ईश्वरसिंहजींसमोर खंडेराव व माधवसिंहजी ह्यांचा तुम्हीं अपमान केलात. हें शोभतें कां तुम्हांला? खंडेरावाचा अपमान म्हणजे होळकरांचा अपमान! माधवसिंहजींचा अपमान म्हणजे एका राजपुत्राचा अपमान! असें कोणतें कारण घडलें कीं या दोन्हीं गोष्टींचें स्मरण न राहतां तुम्हीं बेफामपणें त्यांचा अपमान केलात?

**राजे जयाजीराव**.—काका, काय सांगू तुम्हांला? वडील माणसें तुम्हीं. कोणी सांगितलें तुम्हांला कीं मी त्यांचा अपमान केला म्हणून? अपमान केला तो कशा प्रकारें केला हें तरी कळूं द्याल कां? काकासाहेब, हें संन्याशाला बळी देण्याचें शास्त्र कितपत ठीक आहे?

**सुभेदार मल्हारराव**.—खंडेराव व माधवसिंहजी दोघेही सांगत होते कीं महाराणाजीं-समोर राजे आम्हांला वाटेल तसें टाकून बोलले व आमचा उपमर्द केला. हें योग्य आहे का?

**राजे जयाजीराव**.—काका, खरें सांगितलें तर तुम्हीं रागावणार नाहीं ना? त्या दोघांना क्षमा कराल ना? यापुढें तशी चूक त्यांचेकडून होणार नाहीं. याबद्दल खबरदारी घ्याल ना? मला प्रथम वचन द्याल, तर मी आपणास सर्व हकीकत सांगेन!

**सुभेदार मल्हारराव**.—हो, वचन आहे तुम्हाला. सर्व अगदीं मोकळ्या मनानें सांगा.

**राजे जयाजीराव**.—तो माधवसिंहजी भयंकर मनुष्य आहे. सर्व प्रकारचीं व्यसनें त्याला आहेत. भैय्याला महाराणाजींची वेश्या चंद्रावती हिच्याकडे तो घेऊन गेला होता. तेथें त्यानें त्यास खूप घुटी पाजली. तशा झिंगलेल्या स्थितींत ते दोघेही आम्हांला आढळले. महाराणाजींनीं आपला खिदमतगार शंकर ह्यास बरोबर देऊन त्यांना आपल्या छावणीकडे पाठविलें. आम्हीं एवढेंच म्हटलें कीं भैय्या, हें अयोग्य केलेंत. तुम्हांला शोभत नाहीं.

**सुभेदार मल्हारराव**.—असें असेल तर मी त्या दोघांचीही चांगली खबर घेतों. बेट्यांनीं मला सपशेल खोटें सांगितलें. खंडेराव व्यसनी झाल्यास माझी शाही पार बुडून जाईल. अरेरे! काय करावें? अप्पा, तूं त्यांना तेथेंच झोडपलें कां नाहींस? मी असतों तर माझ्या या सोट्यानें त्यांचा भरपूर समा-चार घेतला असता! तुम्हीं म्हणून स्वस्थ राहिलात!

**राजे जयाजीराव**.—काका, त्यांना क्षमा करा. मला वाटतें हा त्यांचा पहिलाच प्रसंग असावा. यापुढें जरा अधिक काळजी घ्या म्हणजे झालें.

**सुभेदार मल्हारराव**.—अप्पा, कसली कपाळाची काळजी घेणार बाबा? ज्याला घुटी व वेश्या यांची चट एकदां लागली ती जन्मभर सुटणार नाहीं. माझें नशीब फुटकें म्हणून असलें बेअकली पोर माझ्या पोटीं आलें. काय करावयाचें आहे? दैवाला दोष देऊन स्वस्थ बसण्याची वेळ आली आहे.

**राजे जयाजीराव.**—काका, आपण निराश होऊं नका. आपण त्यांना उपदेश करा व त्यांच्यावर नजर ठेवा. मीही काळजी घेईन. भैय्याला त्या माधवसिंहजींच्या संगतींतून दूर केलें म्हणजे सुधारणा खास होईल. (दासी येते) काय आहे? तूं कां आलीस?

**दासी.**—सरकार, महाराणीसाहेब आपल्या भेटीस आल्या आहेत. बाहेर मेण्यांत आहेत. वर्दी देण्याकरितां पुढं मला पाठविलं आहे.

**राजे जयाजीराव.**—बाबा, दासीबरोबर जाऊन महाराणीसाहेबांना सन्मानानें पाठीमागें आंत महाराणींच्याकडे घेऊन जा. आमच्याशींच भेटणें असेल तर शेजारच्या पडद्याआड त्यांना आणन बसवा. दासी, जा बाबांना घेऊन!

**दासी.**—जी हुजूर. (रामचंद्रबाबा व दासी जातात).

**सुभेदार मल्हारराव.**—अप्पा, महाराणी या वेळीं तुझ्याकडे कशाला आल्या आहेत? नुकतेंच भोजन करून तर तेथून आलात; मग लागलीच त्यांनीं इकडे येण्याचें काय कारण?

**राजे जयाजीराव.**—तुम्हांला माहीत आहेच कीं राणाजी मला पगडभाई मानत आहेत. त्यामुळें महाराणी मला भावोजी मानूं लागल्या आहेत. त्या बऱ्याच हुशार, राजकारणी व शूर दिसतात. आज त्यांची नुकतीच मुलाखत झाली त्यावरून त्यांची योग्यता फार मोठी आहे यांत संशय नाहीं. महाराणाजींच्या मानानें त्या फार सरस दिसतात.

**सुभेदार मल्हारराव.**—महाराणी मग आमच्या अहिल्येसारख्याच सद्गुणी दिसतात तर! अशा माउली राज्यांत असल्यावर राज्यलक्ष्मीची भरभराट खात्रीनें होत असते. महाराणी जर योग्यतावान् असतील तर जयपुरराज्याचें कल्याण झाल्यावांचून रहाणार नाहीं. (महाराणी बाजूच्या पडद्यांत येऊन बसतात. दासी व बाबा बाहेर येऊन उभे राहतात). दासी, महाराणींना आमचा आशीर्वाद सांग.

**राजे जयाजीराव.**—महाराणीसाहेब, आमच्या वहिनीसाहेब, ह्यांना आमचा मुजरा सांग.

**महाराणी**—(पडद्यांतून) वडीलांस माझा नमस्कार. भावोजी तुम्हांला आशीर्वाद.

**राजे जयाजीराव.**—वहिनी, हे आमचे काकासाहेब होळकर! हे रामचंद्रबाबा आमचे वडिलांपासूनचे कारभारी!

**महाराणी.**—दोन्हीही विभूति आम्हांला वंद्य आहेत. आतां आम्हीं आलों त्यामुळं वडिलांचं दर्शन झालं. धन्य झालों आम्हीं.

**राजे जयाजीराव.**—वहिनी, आनंदाची बातमी सांगावयाची म्हणजे, दिल्लीपतीकडून व छत्रपतींकडून महाराणाजींना मान्यता आली. बहुमानाचीं वस्त्रेंही येऊन गेलीं. आतां बिलकुल काळजी उरली नाहीं. दरबार भरवून एक वेळ महाराणाजींना तीं वस्त्रें अर्पण करूं म्हणजे झालं.

**महाराणी.**—काकासाहेबांचे व आपले जेवढे आभार मानावे तेवढे थोडे आहेत. आपल्या उभयतांच्या कृपेनंच सर्वकांहीं सुरळीत झालं. जसं महाराणाजीपद आपण मिळवून देऊन त्यांना मोठेंपण दिलंत तशीच आणखी एक कामगिरी पूर्ण करण्याविषयीं आपणांस प्रार्थना करावयाची आहे.

**राजे जयाजीराव.**—हो हो, अगदीं खुशाल करा. तीं साध्य असेल तर ताबडतोब मान्य करूं. आपलें हित करावयाचें हें आमचें धोरणच आहे मुळीं.

**महाराणी.**—ठीक आहे. ऐका तर या अभागिनीचं गाऱ्हाणं.. माझ्यासुद्धां राणाजींना तिघी राण्या आहेत. शिवाय चंद्रावती नांवाची नायकीणही आहे. ते अतिशय विलासी आहेत व त्यांना

ह्या राण्या व वेश्यांपलीकडं कांहीं सुचतच नाहीं. शिवाय दारूचाही नाद विशेष आहे. यामुळं आपण मोठ्या कृपेनं मिळवून दिलेलं मोठेंपण व राज्य तगावं कसं? सर्व परिस्थिति एकदां आपल्यापाशीं मोकळ्या मनानं सांगावी व अनुकूल परिस्थिति निर्माण करावी, या हेतूनं मी आपणाकडे आलें. जयपुरराजघराण्याची दुर्दशा तरच टळेल. नाहींतर काय होईल हें सांगतां येत नाहीं.

**सुभेदार मल्हारराव.**—अप्पा, राणाजींचा व तुमचा स्नेह बराच निकट आहे. म्हणून वेळोंवेळीं उपदेश करून त्यांना काबूंत आणून तूंच सुधारलं पाहिजे.

**महाराणी.**—मला हीच उमेद आहे. म्हणून तर मी मुद्दाम भेटीकरितां आलें आहे. आतां आम्हां लहान मंडळींना तुम्हींच मोठ्या मंडळींनीं सांभाळावयाचं आहे. आम्हीं पोरवय आहों. आमच्या हातून चुका होतीलच पण त्या आपण उदार मनानं माफ करा अशी विनंति आहे.

**सुभेदार मल्हारराव.**—मुली, तुम्हीं काळजी करूं नका. आमचा तुम्हांला पूर्ण आशीर्वाद व पाठिंबा आहे. आमचा जयाप्पा तका सद्गुणी मुलगा आहे कीं तो आपल्या सहवासानें मातीचें सोनें करील. मग महाराणाजीस सुधारण्यास काय वेळ लागणार आहे? बरें बाबा, तुमच्याशीं थोडें बोलावयाचें आहे. तुम्हीं आमच्या छावणीपर्यंत चला. अप्पा मी तुम्हांला न कळत दोष दिला. तूं मजवर रागावूं नकोस हं! तसेंच खंडेराव व माधवसिंहजी यांवरही राग राग करूं नकोस. पोरें आहेत तीं. त्यांना समजूत कमी आहे. बरें आम्हीं जातों. चला बाबा.

**रामचंद्रबाबा.**—चला सुभेदार. सरकार, मी आतां परत येतों.

(दोघेही जातात. महाराणी तोंडावर बुरखा घेऊन बाहेर येते व राजे जयाजीराव यांना नमस्कार करते.)

**राजे जयाजीराव.**—छे, छे! वहिनी हें काय? वडील मंडळींनीं असा नमस्कार करावयाचा नसतो. आपण पडद्यांतून बाहेर येऊन मला अशा प्रकारें नमस्कार करण्याचें कांहींच कारण नव्हतें.

**महाराणी.**—मी यापुढं आपल्याशीं पडदा करणार नाहीं. तुम्हीं माझे धर्माचे दीर किंवा बंधू आहांत. सर्व जयपुरराज्याची अब्रू आपल्या हातीं आहे. मला आतां वेळोंवेळीं काम पडेल. महाराणाजींना सुधारण्याची प्रतिज्ञा आपण केली आहे. त्यास मी वेळोंवेळीं मदत देईन. बाकी आम्हां बायकांकडून आपल्यासारख्या शूरवीर योध्यास काय मदत होणार? तरी पण आजपासून ह्या द्रौपदीचे आपण कृष्ण भगवान आहांत. जेव्हां जेव्हां मी भक्तिभावानं आपली आठवण करीन तेव्हां तेव्हां त्या प्रभूप्रमाणं धांवून आलं पाहिजे.

**राजे जयाजीराव.**—मला कृष्ण भगवानाच्या पदवीस कशाला बसवितां. मी सामान्य मनुष्य देवाची बरोबरी कशी करणार? जर आपण मला श्रद्धेनें मान देत असाल तर जितकी मदत मजकडून देतां येईल ती मी खात्रीनें देईन. आपण याबद्दल बेफिकीर असा. वेळोंवेळीं आपल्या अडचणी मात्र कळवीत चला.

**महाराणी.**—भावोजी, मी थोडं राजकारणासंबंधीं बोललें तर आपणांस आवडेल कां? महाराणाजी व्यसनी व विलासी असल्यानं रात्रंदिवस त्यांचीच काळजी वाटते. त्यांना सांभाळण्याकरितां आपणांस बऱ्याच गोष्टी कराव्या लागल्या व यापुढंही कराव्या लागतील. मुख्य शत्रु घरांतीलच आहे. त्याला पुढं करून बाकीचे राजे आम्हांला लढविण्याचा प्रयत्न करतात हें आपण पाहिलंच आहे. मेवाडचा महाराणा हा तर आमच्या दीराचा मुख्य पाठिंबा. त्यांना तर आपण खंडणी घेऊन तंग केलंच आहे. ते पुनः डोके वर करणार नाहींत. आतां बुंदी व कोटा येथील राणे फार जबरदस्त असून ते पुनः उचल खाण्याचा संभव आहे. तर त्यांचा पूर्ण पराभव करून त्यांची कायमची कांहीं व्यवस्था केली तर बरं होईल.

**राजे जयाजीराव.**—वहिनी, तुमचें म्हणणें योग्य आहे. आतां काकासाहेबांना विचारून व महाराणाजींची सल्ला घेऊन बुंदी व कोटा येथील राणाजींचाही बंदोबस्त करूं. आपण काळजी करूं नका. आतां उत्सवकार्य थोडक्यांत आटोपून पुढील योजनेस लवकरच लागलें पाहिजे.

**महाराणी.**—भावोजी, मी थोडं स्पष्ट बोललें तर रागावणार नाहीं ना? काकासाहेबांचा ओढा आमच्या दीराकडे अधिक आहे. ते मोठे कारस्थानी आहेत. हळुहळू काकासाहेबांनाच वळवून स्वतःची बाजू बळकट करतील. महाराणाजींचा ते मनापासून द्रोह करतात. कदाचित् काकासाहेब व आपण या दोघांतही वितुष्ट आणण्यास ते कमी करणार नाहींत. असं झालं तर आमचं कसं होईल? हा विचार मनांत येऊन मला इकडं आल्यावांचून राहवलं नाहीं. भावोजी, घडामोडी मोठ्या झपाट्यानं होत आहेत. म्हणून बिकट प्रसंग येण्याची फार धास्ती आहे. भावोजी, या अबलेच्या मनाला नेहमीं या राजकारणाच्या विचारांनीं फार त्रास होत असतो. देव करो व सर्व संकटांतून तो आमचा पार लावो. भविष्यकाळचं चित्र मनापुढं उभं राहिलं कीं भीतीनं हृदय थरथर कांपूं लागतं. मन गोंधळून जातं. कांहीं, कांहीं देखील सुचत नाहीं.

**राजे जयाजीराव.**—वहिनी, तुम्हीं उगीच फार विचार करीत बसतां म्हणून त्रास होतो. आतां विचार करावयाचें अजीबात सोडा. आपली बाजू मी वडिलांच्या ऋणानुबंधास स्मरून घेतली आहे. ती नेहमीं सांवरून धरणें हें माझें कर्तव्यकर्म आहे. मला माहीत आहे कीं काकासाहेब, खंडेराव व माधवसिंहजी ह्यांचें मन माझ्यासंबंधीं साफ नाहीं. त्याला कारण माझी मुतालकी व हें जयपुरप्रकरण होय. जे जे प्रसंग येतील त्यांस तोंड तर दिलेंच पाहिजे. तुम्हीं आमच्यांतील मतभेदांचा विचार करूं नका. राहिला माधवसिंहजी तर त्याच्या बाबतींत आतां धास्ती बाळगण्याचें कारण नाहीं. श्री. छत्रपति, पेशवे व दिल्लीपति यांची महाराणाजींच्या रीतसर हक्कांस पूर्ण संमति आली आहे. राहिले बाकीचे शत्रु. त्यांचा आपण बंदोबस्त लागलीच करूं. वहिनी, तुम्हीं म्हणतां त्याप्रमाणें माधवसिंहजी मात्र अस्तनींतील निखारा आहे. केव्हां आग लावील त्याचा नेम नाहीं. पण त्यास इलाजही काय आहे? सावधगिरीनें त्यांना सांभाळणें हेंच आपलें काम, दुसरें काय?

**महाराणी.**—सर्व बाबतींत आपले विचार कळावे हाच माझा मानस आहे. शिवाय आपल्या पूर्ण माहितीची मला आपल्याजवळ भीक मागावयाची आहे. ती आपण घालाल कां?

**राजे जयाजीराव.**—वहिनी, असें म्हणूं नका. भीक न म्हणतां ती हक्काची मागणी म्हणा. ब्रह्मांड इकडचें तिकडे झालें तरी हा शिंदेराव एकदां जी बाजू घेतो, तिलाच नेहमीं सांवरून धरतो. वरचेवर पगडीबदल करणार नाहींत. तुम्हांला माझें पूर्ण वचन आहे कीं जीवांत जीव असेपर्यंत मी आपणांस अंतर देणार नाहीं.

**महाराणी.**—(पुनः नमस्कार करते) देवा, आणखी दुसरं मला काय पाहिजे! या आपल्या वहिनीला—भगिनीला—आज चुडेदान देण्याचंच अभिवचन दिलं असं म्हणावयास हरकत नाहीं. आतां महाराणाजींशीं खल करून बुंदी व कोटा येथील बंदोबस्ताचं काम प्रथम हातीं घ्यावं. काकासाहेबाचाही काय सल्ला पडतो तें पहावं. मीही आपणांला वचन देतें कीं प्राणांत प्राण असेपर्यंत मी आपणांस विसरणार नाहीं व जितकं साहाय्य आपणांस मला करतां येईल तितकं करीन.

**राजे जयाजीराव.**—बरें वहिनी, आतां तुम्हीं आंत जा. फराळवगैरे करा व हळदीकुंकू घेऊन मग जा. मीही आतां पुढील उद्योगास लागतों. दासी, महाराणींना आंत आमच्या राणीसाहेबांकडे घेऊन जा. त्यांना सांग कीं महाराणीसाहेबांचें स्वागत व्यवस्थित करा.

**दासी.**—जी सरकार. चलावं महाराज.

**महाराणी.**—येते बरं मी. सर्व गोष्टी नीट ध्यानांत ठेवून वेळोवेळीं माझी आठवण ठेवावी. माझी ही दासी नेहमीं आपल्याकडे निरोप वगैरे घेऊन येत जाईल. ही अगदीं विश्वासाची आहे. कसलाही निरोप हिच्याजवळ अगदीं मोकळ्या मनानं पाठवीत जा. धोका बिलकुल होणार नाहीं. चला चल, राणीसाहेबांची भेट घेऊन मग छावणींत जाऊं. (नमस्कार करते).

**राजे जयाजीराव.**—वहिनी, असाच दयालोभ ठेवा व वरचेवर भेटत जा. या आतां. (महाराणी व दासी जातात) काय करावे ! दिवसेंदिवस या जयपुरप्रकरणानें परिस्थिति पालटत चालली आहे. तिकडे दक्षिणचा व दिल्लीचा बंदोबस्त केला तर इथेंच घरांत मत्सराग्नि धुमसत राहिला आहे. खंडेराव व माधवसिंहजी काकांचें मन बिघडवीत आहेत. शिंदेहोळकर ह्यांच्यामध्ये हा मत्सराग्नि अगदीं स्फुलिंग स्वरूपांत आज वास करीत आहे. पण तो केव्हां भडकेल याचा नियम नाहीं. जवळ राहिलें तर गैरसमज सारखे होत आहेत. ते दूर करतां करतां नाकीं नव येत आहेत. त्यापेक्षां कांहींतरी कामगिरी काढून निरनिराळ्या ठिकाणीं दौलतीची सेवा करीत राहिलें तर ठीक होईल. म्हणजे मत्सराचा विसर पडून कदाचित् मनें साफ होण्याचा संभव आहे. बरें, काका बाबांना बोलावून गेले. काय हेतु असावा बरं ? बाबांना फोडण्याचा तर विचार नसेल ना ? पण छे. बाबा आमचे पिढीजात नौकर. त्यांचेकडून भलतें कांहीं व्हावयाचें नाहीं. काकांना सांगावें कीं माधवसिंहजीस घेऊन तुम्हीं रामपुराकडे जा. मी ईश्वरसिंहजींसह बुंदी व कोटयाचा बंदोबस्त करतों. अशा रीतीनें अनायासें दूर होऊं व गैरसमज कमी होत जातील. देवा ज्योतिर्लिंगा ! कैलासनाथा ! वडिलांची पुण्याई जबर म्हणून तूं आमच्यावर दया ठेवतोस व वेळेवर सावध करीत आहेस. अशीच दया या आपल्या एकाकी भक्तावर ठेवावी. सर्व संकटें पार करणारा तूंच बाबा एक त्राता आहेस (जातात).

---

## अंक दुसरा.

### प्रवेश तिसरा.

(सुभेदार मल्हाररावांची छावणी—अहिल्याबाई व खंडेराव बोलत बसले आहेत).

**अहिल्याबाई.**—नाथ, मी आपणाला किती वेळां समजाऊन सांगितलं कीं माधवसिंहजी भला मनुष्य नाहीं. त्याच्या संगतींत राहिलात तर तुम्हांला भलभलतीं व्यसनं लागतील. अखेर तीच गोष्ट खरी ठरली. मामंजींनीं मला सांगितलं कीं तुम्हीं घुटी पिऊन एका वेश्येकडं पडलेले आढळून आले. किती शरमेची गोष्ट आहे ? ही गोष्ट मला खरी वाटेना म्हणून मी माणूस ठेवून आपला तपास काढला. त्यांत आपण माधवसिंहाच्या संगतींत राहून घुटी फार पीत असल्याचं आढळून आलं. काय करावं तुम्हांला ? तुम्हीं कसे सुधारणार हीच सारखी काळजी वाटत आहे. हें कळल्यापासून जिवाला रात्रंदिवस चैन नाहीं.

**खंडेराव.**—अहिल्या, त्या जयाप्पानें आमचा चांगला सूड घेतला म्हणावयाचा. काकापर्यंत कागाळी करूनच स्वारी थांबली नाहीं. तुझ्यापर्यंत त्यानें लोण पोहोंचविलें म्हणावयाचें ! त्यानें ईश्वरसिंहजींबरोबर नायकिणीकडे जावें, महाराणींशीं खुशाल अघळपघळ बोलत बसावें, इतकेंच काय पण तुझ्याशीं वहिनी वहिनी करीत लडिवाळपणा करावा, तो मात्र दोषी नाहीं ! त्याला सर्व प्रकारची परवानगी आहे ! आम्हीं मात्र माधवसिंहजींबरोबर फिरतां उपयोगी नाहीं. त्याच्याशीं जरा मन मोकळें करून बोलूं नये. राजकीय कैद्याप्रमाणें त्याच्याशीं वागावें असें तुमचें सर्वांचें म्हणणें !

वाहवा जयाप्पा! आमच्या अब्रूचे धिंडवडे महाराणा ईश्वरसिंहजींसमोरच काढून आपलें समाधान झालें नाहीं ? आणखी काका व अहिल्या इकडेही आमची बदनामी केलीत ! याला शुद्ध मन म्हणावें कीं सुडाची लालसा म्हणावी ?

अहिल्याबाई.—उगीच भावोजींना दोष नाहीं द्यावयाचा ! ते बिचारे अगदीं सज्जन आहेत. ते आपल्या घरांतले. तुम्हीं कसल्याही प्रकारचं व्यसन करूं नये ही त्यांची सदिच्छा. ते स्वतः कधींच व कोणत्याच व्यसनाला बळी पडावयाचे नाहींत, ही आमची खात्री आहे. बरं त्यांनीं तुमच्याबद्दल मुळींच तक्रार केली नाहीं. तुम्हींच मामंजींजवळ आपला अपमान केला म्हणून तकरार केलीत. म्हणून त्यांनीं भावोजींना खरी हकीकत विचारली. त्यांनीं ती सांगितली. ह्यांत त्या बिचाऱ्यांचा काय दोष ? बरं मामंजींनीं मला तुमची काळजी घ्यावयास सांगितलं. मीही बारकाईनं शोध ठेविला. तर जी खरी परिस्थिति तीच आढळून आली. मी नेहमीं सांगतें कीं भावोजींसारखे तुम्हीं सद्‌गुणी व्हा. पण तें राहिलं बाजूला. उलट दिवसेंदिवस नाहीं नाहीं त्या व्यसनांत स्वतःस गुरफटून घेऊन सारखे अधोगतीला जात आहांत. नाथ, किती समजावूं तुम्हांला ? आपल्या वडिलांची कीर्ति अखिल भारतांत निनादत राहिली आहे. त्याच्या उलट तुम्हीं अपकीर्ति करून घेणार कां ? वृद्ध वडिलांच्या आंतड्याला किती पीळ पडतो, याची थोडी तरी कल्पना आहे कां आपणाला ? या दीन दासीच्या दैन्याचा अस्पष्ट तरी विचार येतो कां आपणाला ? होळकरशाहीची धुरा आपल्यावर पडणार आहे याबद्दल कधीं विचार करतां कां ? नाथ, बस करा आतां. सर्व व्यसनांला फांटा द्या. त्या माधवसिंहजीची संगत बिलकुल सोडून द्या. भावोजींबद्दलचा मत्सर काढून टाकून त्यांच्याप्रमाणं वागण्यास सुरुवात करा.

खंडेराव.—पहिल्यापासून त्या पाटीलबुवाची तूं पक्षपाती आहेसच म्हणा ! तुला होळकरशाहीपेक्षां शिंदेशाहीच्या भल्याची काळजी अधिक आहे. ही कांहीं आजची गोष्ट नाहीं. तुझा ओढा नेहमीं त्याच्याकडेच आहे. आमच्या अंगीं सर्व दोष व त्या अप्पाच्या अंगीं सर्व प्रकारचे गुण आहेत, ही तुम्हां लोकांची कल्पना कांहीं आजकालची नाहीं. माधवसिंहजीचा सहवास व व्यसनें ह्याबद्दलची शिकायत मात्र नवीन आहे. मी मनुष्य आहे. माणसाला देव होतां येत नाहीं. जे देव म्हणून गाजले जातात त्यांच्याही दिव्याखालीं थोडा तरी अंधार असतोच. अहिल्या, बस कर तुझा उपदेश. त्या ईश्वरसिंहजींला भुरळ पाडून त्यास गिळंकृत करण्याची वेळ आणून पुनः आपले नामानिराळे. शिंदेरावांनीं एक महाराणा हातांशीं धरून खूप हात मारावा व आम्हीं होळकरांनीं त्यांच्या तोंडाकडे पहात फक्त हात जोडीत बसावें हं ? हें धोरण मला तरी पसंत नाहीं. पण आमचें ऐकतो कोण ? काका व अहिल्या ही आमचीं शहाणीं माणसें. आम्हीं आपले मूर्ख ठरलेलेच.

अहिल्याबाई.—नाथ, माझी खात्री आहे कीं त्या सापानं दंश केल्यामुळं मत्सराचा फैलाव आपल्या अंगांत नखशिखांत झालेला आहे. तुमचं मन कलुषित करण्याचा प्रयत्न तो जाणून बुजून करीत आहे. होळकरांच्या पुरुषांचीं मनं शिंदेरावांच्या विरुद्ध बिथरवून मराठ्यांत दुफळी माजवावी हाच त्या शत्रूचा डाव असून तो आज दुर्दैवानं बराच साध्य झाल्याचं आढळून येत आहे. पण नाथ, या दुफळींत मराठेशाहीचा सर्वनाश आहे हें ध्यानांत ठेवा. तो टाळावयाचा असेल, होळकरशाही जगवावयाची असेल तर कृपा करून ही कपाळकरंटी दुफळी जागच्या जागींच गाडून टाका. नाथ, हात जोडून विनंति करतें, पदर पसरून भीक मागतें कीं तुम्हीं मत्सर सोडा. वाईट संगत सोडा. दुर्व्यसनं टाकून द्या. (पाया पडते, तिला तो पायानें लाथाडतो. सुभेदार मल्हारराव व रामचंद्रबाबा येतात).

**सुभेदार मल्हारराव.**—अरे, अरे खंडेराव! होळकरांच्या सौभाग्यलक्ष्मीला असा लाथाडूं नको. तिचा अपमान करूं नको. साध्वीला छळण्यानें पाप होऊन तुझा नाश होईल. सावध हो. तिची माफी माग. तिच्या पाया पड.

**अहिल्याबाई.**—(उठून सुभेदार मल्हारराव व रामचंद्रबाबास नमस्कार करते. खंडेराव खालीं मान घालून स्वस्थ उभा राहतो) मामंजी, अशी शापवाणी बोलूं नका. माझा कितीही छळ केला तरी ते माझे पति आहेत. त्यांना तसा हक्क आहे. राजलक्ष्मीचा शाप त्यांना देऊं नका. आपली वाणी कठोर आहे! ती सत्य होत असते. करा त्यांना क्षमा, आणि आपली शपथवाणी परत घ्या.

**रामचंद्रबाबा.**—धन्य आहे मुली कलियुगांत साध्वी नाहींत हें म्हणणें खोटं आहे. आम्हीं आमच्या डोळयांनीं ती समक्ष पहात आहोंत. तुझ्यासारख्या साध्वी जगांत ठिकठिकाणीं वास करीत आहेत म्हणूनच जग जगलें आहे.

**सुभेदार मल्हारराव.**—बाबा, जितकी ही मावली पवित्र, सदाचारी, शहाणी, सुस्वभावी आहे, तितकाच हा खंडेराव दुर्व्यसनी, पापी आहे. हा होळकरशाहीचा खेळखंडोबा केल्याशिवाय राहणार नाहीं. बाबा, स्वतःचा मुलगा असला म्हणून त्याच्या घाणेरडेपणाची घाण आल्यावांचून राहील का? ह्या मुलाचे अवगुण पाहून दिवसेंदिवस मला अगदीं शिसारी येऊं लागली आहे. बाबा, म्हातारपणीं आतां सुख लागेल असं कांहीं वाटत नाहीं.

**रामचंद्रबाबा.**—खंडेराव, आपल्या वडिलांच्या मर्जीप्रमाणें व लौकिकदृष्टचा योग्य अशी वागणूक ठेवावी. बाबा, आपल्या वागणुकीवर सर्व घराण्याची इज्जत अवलंबून असते. जरा विचारपूर्वक वागलेलें चांगलें. वावग्या वागणुकीनें सहसा फायदा होत नाहीं. शहाण्यांच्या शद्वाला जरूर मान देत जावा.

**खंडेराव.**—अहो म्हातारेबुवा, जो कांहीं उपदेश करावयाचा तो आपल्या शिंदेरावांला करा. इथें सासरा बनून उपदेश करावयास पेरें आहेत. आपलें घोडें आणखी पुढें घुसडण्याची आवश्यकता नाहीं.

**सुभेदार मल्हारराव.**—हं, खंडेराव! चुप्प बैस. वडील माणसांचा असा उपमर्द करूं नकोस. तूं जा व माधवसिंहजीला घेऊन ये.

**खंडेराव.**—आणखी त्याच्या समोर आमची हजेरी घ्यावयाची आहे वाटतें? एकटयाची हजेरी झाली ती पुरे नाहीं वाटतें?

**सुभेदार मल्हारराव.**—अरे तसें नाहीं. थोडीं राजकारणाच्या बाबतींत त्यांच्याशीं वाटाघाट करावयाची आहे. तूं आतां उपदेशाच्या पलीकडे गेला आहेस. तुला आतां बोलावयाचें म्हणजे पालथ्या घडयावर पाणी आहे. जा, त्याला लवकर घेऊन ये.

**खंडेराव.**—काका, मी साफ सांगतों, मी त्याला पाठवून देतों पण मी नाहीं त्याच्याबरोबर येणार.

**सुभेदार मल्हारराव.**—बरें जा. त्याला मात्र लवकर पाठवून दे. (खंडेराव जातो). बाबा, ईश्वरसिंहजीची सर्व हकीकत तुम्हीं महाराणींच्या तोंडून ऐकली. यावरून तुम्हांला काय वाटतें? माझी तरी त्याबद्दलची सहानुभूति कमी कमी होऊं लागली आहे. जयपुरच्या गादीवर असा पुरुष टिकूं शकत नाहीं. तो मला फार कमकुवत वाटतो. त्या मानानें मला माधवसिंहजी अधिक लायक वाटतो. ईश्वरसिंहजीसारख्या कमकुवत माणसाची बाजू आम्हीं घेतली ही मोठी चूक झाली आहे. बाबा, तुम्हीं राजकारण जाणतांच. या बाबतींत आपणांला काय वाटतें?

**रामचंद्रबाबा.**—सुभेदार, आपली बाजू कितीही लंगडी असली तरी ती आपण सोडतां कामा नये. उलट जे कमजोर आहेत त्यांनाच मदत देऊन बळकट करावयास पाहिजे. आमच्या सरकारांचें धोरण तेंच आहे. ज्यांना एकदां वचन दिलें तें केव्हांही बदलावयाचें नाहीं !

**सुभेदार मल्हारराव.**—त्याला जर भरपूर कारणें असलीं तरीही आपण बदलावयाचें नाहीं हा अट्टाहास होईल. राजकारणांत असें करून कसें चालेल ? परिस्थितीप्रमाणें आपल्या धोरणांतही फरक करावा लागतो. महाराणाजींकडून अद्याप पांच लाख नजराणा यावयाचा बाकी आहे तोही अद्याप आला नाहीं; शिवाय पुढें त्यांच्याकडून कांहीं अधिक प्राप्ती होईल असें मला तरी कांहीं वाटत नाहीं. बाबा, तुम्हींच विचार करा. ईश्वरसिंहजी विलासी आहे. त्याचा खर्च अफाट आहे. तो दुर्व्यसनी आहे. तो नादान आहे. तो कर्जबाजारी आहे. अशा पुरुषाच्या नादीं लागून आमचें मराठेशाहीचें राजकारण कसें साधेल ? हिंदुपदपातशाहीच्या कल्पनेस पूर्णत्व कसें यावें ? जयपुरसारख्या राजाची शक्ति आम्हांला उपयोगी पडणार नाहीं तर आम्हीं या प्रकरणांत पडून फायदा तरी कोणता ?

**अहिल्याबाई.**—मामंजी, आपले हे विचार योग्य नाहींत. आपण जी बाजू घेतली आहे तिच्यांत सर्व प्रकारचं सामर्थ्य निर्माण करण्याचं काम आपलं आहे. ईश्वरसिंहजी महाराण्याच्या बाबतींत जेवढे दोष असतील ते सर्व काढून टाकण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. ईश्वरसिंहजी वडील आहेत. महाराणा सवाई जयसिंहजींनींही त्यांनाच गादी मिळावी अशी योजना केली होती. भावोजींनीं व तुम्हीं त्यांची बाजू धरली. त्यास श्री छत्रपति, पेशवे व दिल्लीपति यांनीं पूर्ण मान्यता दिली. सर्व गोष्टी होऊन गेल्या. मराठ्यांची कीर्ति सर्व राजपुतांत प्रस्थापित झाली. आतां तुम्हीं बाजू बदलली तर त्यांत तुमचीच बदनामी होईल मराठे शद्वाचे पक्के नसतात अशी सर्व मराठ्यांची नाचक्की होईल. विचार करा. राजपूत जसा वचनाचा पक्का असतो अशी समजूत आहे तसाच मराठाही शब्दाचा पक्का असतो असं सिद्ध झालं पाहिजे.

**सुभेदार मल्हारराव.**—मुली, समज चुकीनें एखादी बाजू आम्हीं धरली. प्रथम आम्हांला परिस्थिति बरोबर अजमावतां आली नाहीं तर झालेल्या चुकीला दुरुस्त करूं नये काय ? यांत अप्पांनाही कांहीं वाईट वाटावयाचें कारण नाहीं. आम्हीं तरी एकंदर मराठा दौलतीच्या दृष्टीनेंच विचार करतों ना ?

**अहिल्याबाई.**—ह्याचा परिणाम किती भयंकर होणार आहे याची कल्पना आपणांस आहे का ? राजपुतांत राणोजीबाबांनीं मराठ्यांसंबंधीं जो आदर, जो प्रेमभाव निर्माण केला होता तो जर वचनं बदललीं तर कायम कसा राहील बरं ? आजपर्यंत सर्वांचा असा विश्वास आहे कीं मराठे शद्वाचे पक्के आहेत. पण यापुढं मोठा गैरसमज होईल. मराठे पैशाकरितां—आपल्या फायद्याकरितां—दिलेलीं वचनं मोडतात ही अश्रद्धा होणं दौलतीच्या हिताच्या दृष्टीनं अत्यंत घातक आहे. मामंजी, राजकारण माझ्यापेक्षां आपणांस अधिक कळतं. मी ह्या बाबतींत काय बोलूं शकणार ?

**रामचंद्रबाबा.**—सुभेदार, मुलगी म्हणते तें बरोबर आहे. मराठ्यांनीं पगडीबदल करणें म्हणजे आपणहून आपल्या पायावर दगड पाडून घेणें आहे. आपण केलेले विचार माझ्याही दृष्टीनें घातक आहे.

**सुभेदार मल्हारराव.**—जोंपर्यंत आमच्या मनगटांत बळ आहे, तोंपर्यंत आम्हांला असल्या अश्रद्धेची पर्वा करण्याचें कारण नाहीं. आज छत्रपतींना पैसा पाहिजे, पेशव्यांना पैसा पाहिजे मग तो होळकरांनाच कां नको ? शिंद्यांच्याप्रमाणें आम्हीं कानावर तुळशीपत्रें ठेविलेलीं नाहींत. आम्हांला पैसा पाहिजे. जिकडून तो अधिक मिळेल ती आमची बाजू.

**अहिल्याबाई.**—मामंजी, हें आपलं धोरण अगदीं चुकीचं आहे. आपण पुनः शांतपणं विचार करा म्हणजे आपणांला माझं म्हणणं पटेल. माधवसिंहजी आले वाटतं. मी जातें. मात्र जें ठरवाल तें विचारपूर्वक ठरवा (जाते. लागलीच माधवसिंहजी येतात.)

**माधवसिंहजी.**—(पडद्याकडे पहात) अहो वहिनी, मी माधवसिंहजी आहे. मला कशाला लाजावयास पाहिजे. परत या ना.

**सुभेदार मल्हारराव.**—माधवसिंहजी जाऊं दे तिला. तिचें इथें कांहीं काम नाहीं. उगीच तिला तूं बोलावून त्रास देत जाऊं नकोस. तुझा स्वभाव तिला आवडत नाहीं. तुमच्यासारख्या व्यसनी माणसांनीं तिच्यासारख्या साध्वीबरोबर उगीच लघळपणा करूं नये. तिच्यापासून नेहमीं दूर रहावें.

**माधवसिंहजी.**—काकासाहेब, माफ करा मला. मी अगदीं निष्कपटपणानें त्यांना बोलाविलें. त्यांना आवडत नसेल तर मी यापुढें त्यांच्याशीं बोलणार नाहीं. (एकीकडे) म्हाताऱ्या, या माधवसिंहजीचा तूं अपमान करीत आहेस! हें ध्यानांत ठेव. हें राजपुतचें हाडमांस आहे. धनगराचें नाहीं. माझा अपमान करणें ही साधी गोष्ट नाहीं. (उघड) बरें काकासाहेब, तुम्हीं मला इतक्या तातडीनें कां बोलाविलेंत? असें कोणतें जरूरी काम होतें?

**सुभेदार मल्हारराव.**—माधवसिंहजी हे आमचे रामचंद्रबाबा आहेत. हें शिंदेरावांचे पिढीजात कारभारी आहेत. तुझ्या जयपुरच्या गादीसंबंधीं काय तकरारी आहेत त्या मोकळ्या मनानें सांग. म्हणजे आम्हीं दोघे त्यावर विचार करून काय तें नक्की ठरवूं.

**माधवसिंहजी.**—काकासाहेब, मी सवाई जयसिंहजींचा पुत्र असून—राजपुत्र असून—आपण, शिंदेराव व आमचे दादा यांनीं माझी काय स्थिति केली आहे, हें मी काय सांगूं? मोठ्या खटपटीनें जयपुरचा माझा हिस्सा मिळविण्याचा प्रयत्न मी करीत होतों. तर शिंदेराव व तुम्हीं दादास मदत आलांत व माझा मोड केलात. बरें दादानें पूर्वी मला चोवीस लाख पये सालीना व रामपुरा परगणा द्यावयाचा असा करार केला होता. पण हरगोविंद व विद्याधर ह्या कारभाऱ्यांच्या सांगण्यांत येऊन दादांनीं मला कांहींच न देण्याचें ठरविलें. म्हणून खटपट करून मेवाडाधिपति व बुंदी व कोटा येथील फक्त तीन लाख व परगणा ह्यांवर मला बसविलेंत व माझा नाश केलात! दैवाला दोष देत मी सध्यां हात जोडून बसलों आहे. कायदेशीर रीतीनें दादांना जयपुरचा महाराणा बनविणें असेल तर खुशाल बनवा. त्याला माझी ना नाहीं. पण माझ्या एकवीस लाखांची काय वाट? एकंदर मला चौवीस लाख पये हर साल मिळावयास पाहिजेत, तेथें तीन लाखांचा राव करून मला ठकविलेलें आहे.

**सुभेदार मल्हारराव.**—बाबा, का ईश्वरसिंहजीनें त्यास चोवीस लाख पये सालीना द्यावयाचा ठराव केलेला असून तो पाळला गेला नाहीं. आतां मला सांगा सत्पक्ष कोणाचा आहे? माधवसिंहजी, महाराणाजी अगोदर चोवीस लाख रुपये द्यावयास तयार झाले असतां मागाहून कां बदलले?

**माधवसिंहजी.**—काकासाहेब, त्यांचे सल्लागार हरगोविंद व विद्याधर. जेव्हां तुम्हां मराठ्यांची मदत नक्की मिळते आहे असें त्यांनीं पाहिलें, तेव्हां त्यांनीं मला धाब्यावर बसविण्याची सल्ला दिली. मेवाडच्या राणाजींची किंवा इतर आमच्या सायीदारांची भीति त्यांस वाटली नाहीं. तुमच्या व माझ्या वडिलांचा स्नेह असून तुम्हीं मराठ्यांनीं एका पुत्रास तर उंच शिखरावर चढविलें व दुसऱ्यास बळोप्रमाणें पाताळांत दाबून टाकिलें आहे. केवढा अन्याय केला आहे तुम्हीं याची कल्पना या दुखावलेल्या हृदयाशिवाय दुसऱ्या कोणास केव्हांच कळावयाची नाहीं.

**सुभेदार मल्हारराव.**—बाबा, ऐकलीत या दुःखी जिवाची कहाणी. हीच ऐकण्याकरितां मी तुम्हांस बोलाविलें होतें. आपणांस दोघेही पुत्र सारखेच. त्या दोघांची नीट व्यवस्था लावून, जयपुरची गादी व्यवस्थित चालवावयाची हा मुख्य हेतु. मग सांगा तुमचे विचार. आपण माधवसिंहजींचा अन्याय दूर करावयास पाहिजे किंवा नाहीं? आज अगदीं मोकळ्या मनानें आपली सल्ला द्या.

**रामचंद्रबाबा.**—सुभेदार, आपण म्हणतां ती गोष्ट खरी आहे. पण आमच्या मालकांनीं जी एक बाजू धरली तिला चिटकून रहाणें हें आमचें कर्तव्य आहे. आतां तुमची गोष्ट वेगळी आहे. आमच्या सरकारना किंवा पेशव्यांना आपण खुद्द सांगू शकता. हा झालेला अन्याय दूर होऊं शकतो. आमच्या सरकारांचा तरी माधवसिंहजींवर अन्याय करण्याचा थोडाच विचार आहे?

**सुभेदार मल्हारराव.**—ठीक आहे बाबा. समजले आपले विचार. बरें माधवसिंहजी, बोल बाबा, मी जर तुझी बाजू मांडली तर तूं आम्हां मराठ्यांना काय देणार? जगांतला न्याय तुला माहीत आहेच—दाम तसें काम!

**माधवसिंहजी.**—काका, तुम्हीं जर या आपल्या धर्मपुत्राला हातीं धरलेंत तर मला जितकी देतां येईल तितकी रक्कम मी आपणांस देईन. किंवा असें कशाला, तुम्हांला जेवढी लागेल तेवढी रक्कम किंवा मुलूख तुम्हीं घ्यावा. जो माझ्या ताब्यांत द्याल त्यावरच मी खूष राहीन. आपल्या आज्ञेच्या बाहेर मी जाणार नाहीं.

**सुभेदार मल्हारराव.**—तुझा अन्याय दूर करावयाचा म्हणजे तुला सालीना चोवीस लाखांची जहागीर करून देऊन रामपुरा परगणा देणें होय. असेंच कीं नाहीं? बरं तर, तूं मला नजराणा देण्याचें कबूल केलें आहेस तो मागाहून पाहूं. प्रथम आपण पेशव्यांकडे वकील व सांडणीस्वार पाठवून देऊं. त्यांत त्यांनीं ईश्वरसिंहजीकडून येणें आहे त्याची मागणी करावी. सर्व हल्लींची परिस्थिति समजाऊन सांगावी. व पेशव्यांना मागतील तेवढा नजराणा कबूल करावा. पेशवा आहे पैशाचा लोभी. तो तावडतोब तुझ्या बाजूला येईल. काय बाबा, हें ठीक होईल कीं नाहीं?

**माधवसिंहजी.**—बरें पण तुम्हीं दोघांनीं निरनिराळीं पत्रें पेशवेदरबारला द्यावीं. तरच ते यांत लक्ष घालतील. एरवीं लक्ष घालणार नाहींत. काका, बाबा, तुम्हीं या बालकास हातीं धरलें तर मी आपला जन्माचा ऋणी होईन व आपले उपकार फेडल्यावांचून रहाणार नाहीं. तरी आपण पत्रें लिहून द्या. मी माझ्या वकिलास आजच रवाना करतों. आपण सांगितल्याप्रमाणें सर्व गोष्टी खुलासेवार पेशव्यांना कळविण्याची व्यवस्था करतों. आज माझें भाग्य पुनः उदय पावलें म्हणावयाचें! पत्रें मात्र जरूर द्या.

**सुभेदार मल्हारराव.**—बरें, ठीक आहे. मी तुला पेशव्यांकरितां पत्रें तयार करून देतों. आज वकीलास रवाना करूं या. मल्हारीमार्तंड तुला यश देवो! बाबा, तुम्हीं पत्र देतां कां? पेशव्यांचा आपणावर फार मोठा भरंवसा आहे. बिचाऱ्या माधवसिंहजींच्या कार्यास फार मदत होणार आहे. पहा तुम्हांला कांहीं दया येत असेल तर!

**रामचंद्रबाबा.**—सुभेदार, आम्हीं पडलों नौकर माणसें. मालकाच्या हुकुमाप्रमाणें वागणारे. अशा स्थितींत मालकांच्या परवानगीशिवाय मला कांहीं करतां यावयाचें नाहीं. आतां पेशव्यांनीं जर पत्रानें मला आपलें मत विचारलें तर शक्य तितकें माधवसिंहजींस सहाय्य देऊं. आत्तां आम्हांला कांहींच करतां येणार नाहीं. हें सर्व भाषण आम्हीं ऐकलें, हाच वास्तविक स्वामिद्रोह झाला आहे. पण आपला पहिल्यापासूनचा अकृत्रिम स्नेह मला डांबून ठेवीत आहे. एकंदरींत मुलगी म्हणते त्याप्रमाणें परिस्थिति भयंकर येणार अशीं दुःस्वप्नें मलासुद्धां आज पडत आहे.

सुभेदार मल्हारराव.—माधवसिंहजी, जा ताबडतोब कार्याला लाग. पाहूं पुढें काय होतें तें. भविष्यकाळच्या कल्पित कल्पनांनीं गांगरून जाणारा हा मल्हारी नाहीं.

माधवसिंहजी.—बरें, काकासाहेब, बाबा, मी येतों. आतां या मृत देहांत आज आपण नवचैतन्य घातलें आहे. जन्माचें ऋणी केलें आहे मला तुम्हीं. (दोघांना नमस्कार करून जातो.)

रामचंद्रबाबा.—सुभेदार, मीही जातों आतां. मी आपली अशी परवानगी घेऊन ठेवितों कीं जी गोष्ट आपण आज करीत आहांत ती मी मालकांच्या कानावर घालतों, म्हणजे मी स्वामिद्रोहां-तून मुक्त होईन.

सुभेदार मल्हारराव.—स्वामिद्रोहाची आपणांस भीति वाटते? पण मित्रद्रोहाबद्दल आप-णाला मुळींच फिकीर वाटत नाहीं ना? अप्पास तुम्हीं कळविल्यानें आमचीं दोघांचीं मनें अधिक फाटतील, एवढेंच काय तें! पुढें केव्हांतरी कळेल तेव्हां कळेल. तुम्हींहून आजच कशाला तें पाप करतां?

रामचंद्रबाबा.—सुभेदार, मग प्रामाणिकपणा तो काय राहिला? मालक आपल्यावर विश्वास ठेवतो तर आम्हींही मिठाला जागलें पाहिजे. जयपुरप्रकरणाचा बनाव आतां भलताच होणार आहे. त्याबद्दल त्यांना सावध करणें माझें कारभाऱ्याचें काम आहे. आतां कोठपर्यंत त्यांना प्रकरण समजवावें हा प्रश्न आहे.

सुभेदार मल्हारराव.—हें पहा बाबा, तुम्हांला जसें योग्य दिसेल त्याप्रमाणें तुम्हीं आपल्या मालकास सावध करा. या सुभेदारानें तर आतां या जयपुरप्रकरणांत पुरता हात घातला आहे. त्याचा शेवट करीन तेव्हांच राहीन. (अहिल्याबाई व दासी येतात) अहिल्या, तुझें आम्हीं ऐकणार नाहीं. या माधवसिंहाला वाजवी हिस्सा तरी मिळवून देऊं किंवा त्याला जयपुरचा महाराणा बनवूं. आम्हीं आतां आपले हात धुवून घेतल्यावांचून रहाणार नाहीं. सर्व जग पैशापाठीमागें धांवत आहे. मग आम्हीं तरी येणाऱ्या लक्ष्मीला पाठमोरे कां व्हावें? बाबा, होळकरांच्याबरोबर तुम्हीं आपलेंही कल्याण करून घ्या. जेवढा पैसा तुम्हांला पाहिजे तेवढा हा मल्हारराव तुम्हांला देईल. मात्र अप्पाला सांभाळण्याची सर्व जबाबदारी तुमच्यावर. आमचा निश्चय तर कायम आहे. सगळीं शास्त्रें, पुराणें आतां आम्हीं पोथ्यांत गुंडाळून ठेवणार! जितका पैसा मिळवितां येईल तितका मिळवावयाचा. दरबारनें मुतालकीचे अधिकार दिले नाहींत म्हणून माशा मारत बसावयाचें नाहीं. स्वतःच्या मन-गटाच्या बळावर मुतालकी गाजवावयाची.

अहिल्याबाई.—मामंजी, आपणांमध्यें पुनः कलीनं संचार केला असं दिसतं. आपला मत्सराग्नि सारखा अधिक अधिक पेट घेत आहे. त्यावरून मराठेशाहीचे दिवस फिरले आहेत यांत शंका नाहीं. मराठ्यांची दानत धुळीला मिळून आजवर कमावलेली सर्व कीर्ति आतां तुम्हीं गमावणार यांत बिलकुल संशय नाहीं. बाबा, आपणही मुरब्बी मुत्सद्दी आहांत. मामंजींना आपण तरी सम-जाऊन सांगा. माझं लहानाचं ऐकावयास ते तयार नाहींत.

रामचंद्रबाबा.—मी परोपरीनें त्यांना विनविलें पण ते ऐकत नाहींत. आतां ते कांहीं लहान मूल नाहींत कीं त्यांना रागें भरून चुप बसवावें. सुभेदार, तुम्हीं या बाबाची हीच किंमत केलीत कां? आज मालकांचे दोन पिढ्या अन्न खात आहे, तें कमीं झालें? आपण आतां ह्याला पैशाची लांच दाखवीत आहांत व मोह उत्पन्न करूं पहात आहांत? आश्चर्य आहे! आपणांस झालें आहे तरी काय? हा कसला भयंकर, विषारी, कली तुमच्या अंगांत रोमारोमांतून वावरत आहे? सुभेदार, कदाचित् पैशाचा लोभ या म्हाताऱ्यावरही अंमल करूं लागावयाचा. कृपा करा, तो मजपासून दूर

ठेवा व या म्हाताऱ्यास शेंवटपर्यंत प्रामाणिक राहूं द्या. बरें मी जातों. बराच वेळ झाला. आतां एक विनंति करतों तेवढी मानावी. आपण जें कांहीं कराल तें आमच्या सरकारांच्या कानांवर मोकळ्या मनानें घाला. म्हणजे तेही आपले विचार कायम करतील व शिंदेहोळकरांची तेढ कमी होत जाईल. आतां ही दुनिया तर अधिक अधिक फाटत जाणार. पण धोका तरी रहाणार नाहीं. बोलून चालून गोष्टी केल्यानें तेवढा मनावर परिणाम होणार नाहीं.

**सुभेदार मल्हारराव**.—ठीक आहे तुमचें म्हणणें. प्रसंगाप्रसंगांनीं अप्पाजवळ प्रत्येक गोष्टीचा खुलासा वरचेवर करीत राहूं. मग तर झालें ना? आम्हीं त्याला दगा देणार नाहीं. बाबा, ठीक आहे. तुम्हीं जाऊं शकता. मीही आपणाबरोबर देवदर्शनाकरितां बाहेर येतों. अहिल्या, मी देवदर्शन करून आत्तां येतों. मग फराळ करूं. चला, बाबा.

**रामचंद्रबाबा**.—चला सुभेदार. बरें, येतो मुली. (अहिल्याबाई दोघांनाहीं नमस्कार करते).

**अहिल्याबाई**.—(वाईट तोंड करून) या बाबा, मात्र माझी आपणांला अशी विनंति आहे कीं माझ्या भावोजींना तुम्हीं तरी धोका देऊं नका. (रामचंद्रबाबा खालीं मान घालून नुसते मानेनें 'नाहीं' म्हणून खुणवितात. सुभेदार मल्हारराव व रामचंद्रबाबा जातात). हिरा, आतां फार आणीबाणीची वेळ आली आहे. आपण फारच सावध राहिलं पाहिजे. आमच्या दोन्हीं पुरुषांच्या अंगांत कली मातला असून तो आतां मराठशाहीला भस्मसात करील असं दिसतं. बरं तुला आतां माझीं कामं फार विश्वासानं व सावधगिरीनं करावीं लागतील. मी नेहमीं भावोजींच्या बाजूनं बोलणार व आमचे पुरुष त्यामुळं मजवर नाराज रहातील. हिरा, माझं कर्तव्य मला सोडतां येणार नाहीं.

**हिरा**.—बाईसाहेब, मी आपलं अन्न खातें आहे. माझा प्राण गेला तरी मी आपल्या वचनाबाहेर जाणार नाहीं. जीं आपलीं कामं असतील तीं बिनबोभाट मी पार पाडीन. आपण माझ्यावर पूर्णपणं भरंवसा टाका. कितीही बिकट ठिकाणीं जावयाचं असूं द्या किंवा कसलीही बिकट कामं असूं द्या, तीं मी शेवटास नेईन, याबद्दल खात्री बाळगा.

**अहिल्याबाई**.—इकडं कान कर. (कानांत सांगते) हा म्हातारा तुला ओळखतो व तो नेहमीं ह्यांच्याजवळ असतो. तुला पाहिलं म्हणजे तो सर्व तर्कानं जाणील. मग आपलीं कामं होणं जरा अवघड जाईल.

**हिरा**.—(हंसत) बाईसाहेब, मी वेषांतर करण्यांत फार तरबेज आहे. हुजऱ्याचा पोषाख मला बेमालूम करतां यतो. तुम्हींसुद्धां नाहीं ओळखणार.

**अहिल्याबाई**.—पाहूं बरं. हें नव्हतं मला माहींत. सावधगिरीनं सांगितलेलं काम पार पाडावयाचं. शिवाय आमची पु षमंडळी व ते माधवसिंहजी काय काय करतात याची पूर्ण माहिती ठेवावयाची. मराठशाहीची चाड त्यांना नसली तरी मला आहे! मला स्वतःला सावध राहिलं पाहिजे. व प्राणाहून प्रिय अशा माझ्या भावोजींना मला नेहमीं सावध ठेविलं पाहिजे. मराठ्यांची दौलत, अब्रू व सन्मान त्याशिवाय रहाणार नाहींत. हिंदवी स्वराज्याचं तारूं ह्याशिवाय तरावं कसं? हिरा, जा, सांगितल्याप्रमाणं तें काम उरकून ये. अगदीं सावधपणानं बरं.

**हिरा**.—बाईसाहेब, आपण मुळींच काळजी करूं नका. मराठ्यांच्या दौलतीची मोठ्यांना जेवढी फिकीर त्या मानानं आमच्यासारख्या गरीबासही थोडीबहुत आहेच. आपल्यासारख्या साध्वीच्या सहवासांत राहून एवढंही आम्हांला कळलं नाहीं तर आमचं जिणं व्यर्थ होय. बरं येतें मी आतां. (नमस्कार करून जाते).

**अहिल्याबाई**.—देवा, तूं काय प्रसंग आणणार आहेस? वाडवडिलांनीं ऐक्याकरितां जिवाचं रान केलं व आज मामंजींसारखे राजकारणी शूर पुरुष कुऱ्हाड घेऊन ऐक्यवृक्षाचीं मुळेंच तोडावयास तयार झाले आहेत. जयपुरची भाऊबंदकी म्हणजे आज शिंदेहोळकरांच्याच भाऊबंदकींत अवतीर्ण होत आहे! ईश्वरसिंहजींच्या बाजूनं शिंदेराव व माधवसिंहजींच्या बाजूनें होळकर उभे राहणार! दोघेही होळीचे होळकर जमा करून मराठा दौलत या वैराग्नीच्या किंवा मत्सराग्नीच्या होळींत जाळून खाक करणार. काय भयंकर भविष्य हें. छे छे, ह्याचा नुसता विचारदेखील करवत नाहीं. कैलासनाथा! महेश्वरा! काय करूं? हृदयाची नुसती तगमग होत आहे. हें भावी दुःस्वप्न कसं टाळूं हाच विचार सारखा डोक्यांत वावरत आहे. भावोजी तरुण, मी तरुण, तिकडे पेशवे तरुण. अनुभवीं माणसं सारखीं पगडीबदल करण्यास तयार आहेत. राजकारणाची स्थितिपालट सारखी होत आहे. या सर्व प्रसंगांतून मल्हारीमार्तंडा तूंच बचावून नेणार आहेस. (जाते. पडदा पडतो).

---

# अंक दुसरा.

## प्रवेश चवथा

(राजमहालची छावणीः—चंद्रावतीचा वाडा. खंडेराव, माधवसिंहजी, गणपत, शंकर व चंद्रावती बोलत बसले आहेत.)

**चंद्रावती**.—राणाजी, त्या दिवसापासून आज यावयाला सवड झाली ना व राजपुत्रांनाही आजच घेऊन आलात. मी बहाणा करून महाराणाजींना संशय येऊं नये अशी व्यवस्था केली. तेही ती गोष्ट ताबडतोब विसरून गेले. बरं पण आतां पुढचा बेत कसा? इथली छावणी तर उद्यां हलणार. राजे शिंदेराव ह्यांच्या सैन्यासह महाराणाजी कोटा-बुंदीवर चाल करून जाणार आहेत. मला सैन्याबरोबर जाण्याचा हुकूम झाला आहे. राणाजी, आपलं काय ठरलं? आपण असणार कां आमच्याबरोबर कोटयाच्या स्वारींत?

**माधवसिंहजी**.—चंद्रा, तिकडे येण्याचा माझा विचार होता. पण आमचे काकासाहेब व खंडेराव ऐकत नाहींत. त्यांचा विचार इंदोरकडे जाण्याचा आहे. मी त्यांना आग्रह करतों आहे कीं आपण रामपुरा परगण्यांत मुक्काम करूं या. पण ते ऐकतील तेव्हां खरें?

**खंडेराव**.—भैय्या, तूं बिलकुल काळजी करूं नको. आपण रामपुऱ्यासच मुक्काम ठेवूं. मी काकांना तसेंच सांगेन.

**माधवसिंहजी**.—हो तसेंच केलें पाहिजे. म्हणजे दादा व शिंदेराव ह्यांच्यावर नजर ठेवण्यास ठीक होईल. बरें चंद्रावती, तूं एकदां स्पष्ट सांग तुला दादा पाहिजे कीं मी? शंकर, गणपत, तुम्हीं माझे नोकर रहातां कीं दादांचे? बोला, वचनें देऊन आजच त्याचा निकाल झाला पाहिजे.

**चंद्रावती**.—माझ्या बाबतींत म्हणाल तर मी एका पायावर तयार आहे. तुमच्याबरोबर रामपुऱ्यासच तुम्हीं मला घेऊन चला. मग ही कटकट नको. तुम्हीं जन्मभर अंतर देणार नाहीं एवढं वचन द्या म्हणजे झालं.

**गणपत**.—धनी, महाराणाजींपेक्षां आपल्यावर आमची श्रद्धा फार मोठी आहे. आपण आम्हांला खात्रीनें सरदार बनवाल. महाराणाजी मला न्हावी म्हणतात व हुजऱ्यापेक्षां मोठा दर्जा देण्यास तयार नाहींत.

**शंकर.**—खरेंच धनी. हा महातही सरदार होऊं इच्छितो. धन्याची वाटेल ती चाकरी करूं. मात्र सरदारकी मिळाली पाहिजे.

**माधवसिंहजी.**—गडयांनों तुम्हांला माहीत आहे कीं मी जयपुरचा महाराणाजी होणार आहे. महाराणाजी झाल्यावर जे आज मला मदत करतील त्यांना मी थोर पदवीला चढवीन. पण या वेळीं जिवाची पर्वा न करतां सोंपविलेलीं कामें पुरीं करावयास पाहिजेत. बोला आहांत तयार?

**चंद्रावती.**—मी व माझीं हीं दोन माणसं तुम्हीं सांगाल तें करावयास तयार आहोंत.

**माधवसिंहजी.**—भैय्या, बोल तूं आमच्या कटांत सामील होणार कां? बेलभंडार उचलून द्यावा लागेल?

**खंडेराव.**—भैय्या, मी तर पहिलेच शपथ घेऊन चुकलों आहे. अरे मल्हारीमार्तंडाचा बेलभंडारसुद्धां उचलून द्यावयास तयार आहे. मी तर तुला हाताशीं धरून आमच्या काकासाहेबांची सहानुभूति मिळवून दिली. माझी प्रतिज्ञा तर अशी आहे कीं तुलाच महाराणा बनवावयाचें. दोस्त तो काय? शेवटपर्यंत मदत करील तोच खरा मित्र.

**माधवसिंहजी.**—ठीक आहे. ऐका तर. खंडेराव, तुझा शत्रु जयाप्पा शिंदेराव व माझा शत्रु माझा दादा ईश्वरसिंहजी, आतां दोघे एक आहेत म्हणून त्यांच्यांत फूट पाडावयाची, हें पहिलें काम. दुसरें काम हें कीं जमलें तर दोघांनाहीं जगांतून नाहींसें करावयाचें. कां आहे कां बेत पसंत? खंडेराव, तूं व चंद्रावती ह्यांना ही गोष्ट पटते कां?

**चंद्रावती.**—माझ्या बाबतींत म्हणाल तर मी एका पायावर तयार आहे. ज्या महाराणाजीं-वर आजपर्यंत पतीप्रमाणं प्रेम केलं त्यांनीं शिंदेरावांच्या समोर मला फांसावर लटकविण्याची धमकी दिली. म्हणजे आमचे जीव इतके फालतू आहेत वाटतं? मला फांसावर लटकवणार कां? शंकर, गणपतला हत्तीच्या पायाशीं बांधून ठार मारणार? असली भीति किंवा धमकावणी महाराणाजींनीं आम्हांला दाखवावयास नको होती. जोंपर्यंत आम्हीं प्रामाणिक आहोंत तोंपर्यंत ठीक. पण सापा-प्रमाणं आम्हांस डवचल्यास आम्हीं चावा घेतल्यावांचून सोडणार नाहीं. म्हणून आम्हीं महाराणाजींना सोडण्यास एका पायावर तयार आहोंत. तुमच्याबरोबर रामपुऱ्यासच तुम्हीं मला घेऊन चला. मग ही कटकट नको. तुम्हीं मला जन्मभर अंतर देणार नाहीं एवढं वचन द्या म्हणजे झालं.

**खंडेराव.**—भैय्या, असं पहा, ते जगांतून नाहींसे व्हावेत असें नाहीं मला वाटत. नुसता त्यांचा नक्षा उतरला पाहिजे.

**माधवसिंहजी.**—ते नामोहरम होऊन आपण श्रेष्ठ ठरावें एवढें तरी तुला पसंत आहे ना? ठीक आहे. चंद्रावती तुझें म्हणणें काय? उघड बोलतां येत नसेल तर माझ्या कानांत सांग. बोला आहांत सर्व तयार? (तिघेही माना डोलावतात) ठीक आहे. तर मग पुढील बेत मी आपणा तिघांसच सांगतों. चंद्रावती इकडे कान कर. (तिच्या कानांत सांगतो) समजलें? ईश्वरसिंहजीचें—माझ्या—शत्रूचें काम अशाप्रकारें निघालें पाहिजे. आतां तुम्हां दोघांत पुढारी कोण? बोला शंकर कीं गणपत? जो कोणी माझें काम करील तो सरदार बनेल!

**शंकर.**—आम्हीं आपले एक एकटे पुढारी आहों. तुम्हीं प्रत्येकाला कामगिरी सांगून द्या. जो ती पूर्ण करील त्याला तुम्हीं सरदार नेमा.

**गणपत.**—राणाजी, असेंच करा म्हणजे आमच्यांत कोण कर्तबगार आहे हें तावडतोब सिद्ध होईल.

**माधवसिंहजी.**—भले बहाद्दर. एक एक मजजवळ या. मी तुम्हांला आज्ञा देऊन ठेवतों. जो यशस्वी होईल त्यास सरदारकी मिळालीच. बरें दोघेही यशस्वी झालां तर दोघांनाही मी सरदार बनवीन. या इकडे. (प्रथम शंकर येतो त्याच्या कानांत त्याची कामगिरी सांगतो नंतर गणपतच्या कानांत त्याची कामगिरी सांगतो)

**शंकर व गणपत.**—(दोघेही हात जोडून) धन्याचा जयजयकार असो! काम फत्ते म्हणून समजा.

**चंद्रावती.**—माझंही काम फत्ते म्हणून समजा. या आतां या निमित्तानं थोडं अमृतपान करा. (घुटीचे पेले भरते व सर्वांना देते व स्वतःही पिते) आज कुठलाही भेदभाव आम्हीं ठेवीत नाहीं. सगळे आम्हीं एक आहोंत, सर्व एका नावेंत बसलों आहों!

**माधवसिंहजी.**—शंकर, गणपत या मजा करा. तुम्हांलासुद्धां आमच्याबरोबर मजा करण्याची आज मुभा आहे. आज कोणाची पर्वा करावयाची नाहीं. दादा-शिंदेरावांचेंच काय तर प्रत्यक्ष देव आला तरी त्यास भ्यावयाचें नाहीं. मात्र आपआपलें काम चुकूनसुद्धां तोंडून उच्चारावयाचें नाहीं. भैय्या, घे आणखी घे. तू पी, मी पितों.

**खंडेराव.**—भैय्या, पी. काका असोत नाहींतर अहिल्या असो. मी कोणाची पर्वा करणार नाहीं. घुटी अमृत आहे. दोस्ती अमृतापेक्षांही गोड आहे (इतक्यांत अहिल्याबाईची दासी येते) हिरा, अग तूं इथें का आलीस? तुला कसें कळलें मी इथें आहे? अहिल्या आली आहे कां? तिनें तुला पाठविलें कां? बोल, नाहींतर येथून चालती हो.

**हिरा.**—महाराज, काकासाहेबांनीं मला आपल्याकडं पाठविलें आहे. सैन्याची कूच करण्याची सर्व तयारी झाली आहे व ते तुमच्या शोधांत आहेत. बाईसाहेबही तुमच्या काळजींत आहेत.

**खंडेराव.**—उद्यां मुक्काम हलवावयाचा ठरलें असून आजच निघावयाचें हें केव्हां ठरलें? तिला मजसंबंधीं काळजी करण्याचें कारण? मी कां लहान अर्भक आहे? जा त्यांना दोघांना जाऊन सांग मी आतां येत नाहीं. मी सुखांत आहे. या वेळीं मी स्वर्गांत आहे. मी या वेळीं येऊं शकत नाहीं. माणसाला कांहींतरी स्वतंत्रता पाहिजे. त्या म्हाताऱ्यानें व त्या बायकोनें मला अगदीं घरकोंबडा बनवून ठेविलें होतें. पण माझा भैय्या मिळाला, चंद्रावती मिळाली, हे दोस्त मिळाले, पृथ्वीवर स्वर्ग अवतरला, स्वर्ग! हिरा, तूंही या स्वर्गांत सामील हो. तूं स्वर्गांतील परी हो. हें अमृत घेतलें कीं तुला पंख फुटतील. तूं परी होशील, परी. मग या आकाशांत तूं उडत राहशील. उषःकालच्या प्रभेशीं व सायंकाळच्या संध्येशीं तूं समरस होशील. आकाशांत उंच भराऱ्या मारणाऱ्या पक्षांशीं तुझी चढाओढ लागेल. थोडी तरी घेच. चंद्रावती, दे तिला थोडी. तिला ही दीक्षा दे म्हणजे मला घरीं अडचण पडणार नाहीं.

**हिरा.**—महाराज, काय हें भलतंच! मी नाहीं घुटीला शिवणार. चंद्राबाई, काय ढंग माजविले आहेत तुम्हीं! खाशा मंडळींनां असं व्यसनी बनविणं शोभतं कां तुम्हांला?

**चंद्रावती.**—(पेला भरून) हिरे, तुला घ्यावयाची असली तर घे नाहींतर कांहीं न बोलतां येथून जा कशी. सरकार कांहीं आत्तांच तुझ्याबरोबर येणार नाहींत. सरकार, तुम्हींच घ्या हें अमृत. (पेला देते)

**खंडेराव.**—(घेऊन पीत) हिरा, तूं जा, चंद्रा सांगते तसेंच आम्हीं वागणार. ती रंभा आहे. मी मागाहून येतों. अहिल्येला सांग मी लवकर येतों. मी अमृत पीत होतों हें काकांना सांगू

नको. नाहींतर सांग. काय करतात ते मला? मला कोणाची पर्वा नाहीं. तूं इथून जा कशी. आमच्या आनंदाचा विरस करूं नको.

**माधवसिंहजी**—हिरा, काकांना व तुझ्या बाईसाहेबांना सांग कीं खंडेराव माधवसिंहजीचा दोस्त आहे. तो त्याच्याबरोबरच राहणार समजलीस. त्यांचा खंडेरावावर आतां बिलकुल हक्क नाहीं. तूं जा. तो येणार नाहीं. तो व मी बरोबर येऊं वहिनींना म्हणावें जेवण्याची तयारी ठेवा. वाटलें तर त्या (हंसत) अप्पालाही बोलवा कारण त्यांना त्याच्याशिवाय चैन पडावयाचें नाहीं. माझा भैय्या बिचारा मूर्ख व बावळा आहे. त्याला स्त्रीचा मायावीपणा कळत नाहीं.

**खंडेराव**—(चिडून) भैय्या, अहिल्येबद्दल कांहीं बोलूं नको. ती देवी आहे. मीच व्यसनी आहे. हिरा, तूं जा मी लवकरच येतों.

**माधवसिंहजी**—(एकीकडे) काय बायकोची तरफदारी करतो आहे! पण बेटा, हा नांवाचा माधवसिंहजी आहे. तुम्हां मराठ्यांचा सर्वनाश करीन तेव्हांच माझें समाधान होईल. (उघड) भैय्या, विनोदही तुला समजत नाहीं? हिरा, तूं खंडेरावाला घेऊन जाण्याच्या निश्चयानेंच उभी असलीस तर त्याला घेऊन जा. माझी हरकत नाहीं. काका व वहिनी यांना मात्र भलतेंच सांगूं नकोस.

**हिरा**—तुम्हीं सर्वजण घुटी प्याला आहांत. तुमच्याशीं मला अधिक बोलतां येत नाहीं. महाराज, मला आपल्याला घेतल्याशिवाय जातां येणार नाहीं. कारण थोरले महाराज व बाईसाहेब यांची मला तशी आज्ञा आहे.

**माधवसिंहजी**—भैय्या, तूं आतां जा. आपलीं बरींच कामें अजून व्हावयाचीं आहेत, म्हणून आतांच काकांना व वहिनींना नाराज करावयाचें नाहीं. हिरा, तूं भैय्याला घेऊन जा. पण इथली कांहीं गोष्ट सांगूं नको हो. हें घे इनाम. (गळ्यांतील मोत्याची माळ काढून देतो. ती घेते).

**हिरा**—(एकीकडे) हें इनाम नसून तुझ्या पापाचा घडा फोडणारा हा पुरावा आहे. (उघड) महाराज, चला लवकर.

**खंडेराव**—भैय्या, चंद्रा, दोस्त हो, तुमची इच्छा आहे तर मी जातों. पण हें सुख सोडून जाववत नाहीं. चल हिरा. मी आलों. नाहींतर अहिल्येला वाईट वाटेल. (हिरा व तिच्या मागें खंडेराव असे जातात).

**माधवसिंहजी**—चंद्रा, तूं दादाचें काम काढावयाचें व शंकर, गणपत तुम्हीं तुमचीं कामें पार पाडावयाचीं समजलांत. तुम्हां प्रत्येकजणास हें घ्या इनाम. आजपासूनच आपल्या कामाला सुरुवात झाली पाहिजे (गळ्यांतील हिऱ्याचा कंठा चंद्रावतीस देतो. हातांतील एक एक कंकण काढून शंकर व गणपत यांस देतो).

**चंद्रावती**—(हिऱ्याच्या कंठ्याकडे पहात) राणाजी, इतक्यांतच इनामाची काय आवश्यकता होती? किती सुंदर व बहुमोल आहे कंठा हा! राणाजी आपण फार मोठे दाते आहांत. किती किंमतीचा असेल बरं हा? निदान दहा हजार! शंकर-गणपत, पाहिलंत राणाजी किती उदार आहेत! मी तुम्हांला प्रथमपासूनच म्हणत होतें कीं राणाजी फार उदार आहेत, त्याचा आला कीं नाहीं अनुभव?

**शंकर**—(कंकणाकडे पहात) बाईसाहेब, थोर हे केव्हांही थोरच! ते कां धनलोभी होळकर आहेत? अहो ते खंडेराव आले, पण एकदांतरी एखादी मोहोर इनाम दिली कां त्यांनीं?

**गणपत**—(कंकण हातांत घालीत) आतां सरदार व्हावयास काय वेळ आहे. काम फत्ते कीं मिळालीच सरदारकी. धन्य आहे राणाजी तुमच्या उदार स्वभावाची!

**माधवसिंहजी.**—हं, आम्हीं जातों. आतां आपआपलीं कामें नीट सांभाळून पार पाडा. आतां मध्यंतरी आपली भेट व्हावयाची नाहीं. आजच आमचा मुक्काम रामपुऱ्याकडे जाणार. उद्यां तुम्हीं व महाराणाजी कोटयाकडे रवाना व्हाल. तेथें गेल्यावर दोन्ही खाशांचा नायनाट करावयाचा. यश मिळतांच इनाम. चंद्रावती, संधि मिळतांच घुटींत विषप्रयोग व शंकर, गणपत लढाईत जवळ राहून अपघात करावयाचा. साधेल त्या रीतीनें महाराणाजी व शिंदेराव नेस्तनाबूत झालेच पाहिजेत. मी आतां जातों. तुम्हीं तिघे एकविचारानें असा. माझा हेर तुम्हांला वरचेवर भेटेल. त्याच्याजवळ सर्व घडलेली हकीकत कळवीत जा. मात्र माझी मुद्रा दाखविल्याशिवाय हेराजवळ तोंड उघडावयाचें नाहीं.

**चंद्रावती.**—राणाजींची आज्ञा मान्य आहे. (माधवसिंहजी जातात. सर्वजण त्याला ताजीम देतात) शंकर, गणपत, कसं काय बाबांनों? शिकार साधूं लागली ना ? आतां तुमचे विचार स्पष्ट सांगा. आपण तिघेही कायमचे साथीदार आहोंत. कोणतं काम करावयाचं व कोणतं नाहीं हें निश्चित ठरविलं पाहिजे. मला वाटतं महाराणाजींना सांभाळून घेतलं पाहिजे. शिंदेरावांची चांदी उडविण्यास हरकत नाहीं. कारण त्यांच्याकडून आपणांस कांहीं फायदा नाहीं. बोला तुमचे काय विचार आहेत ?

**शंकर.**—मलाही तसेंच वाटतें. महाराणाजींचा घात आपण सध्यांतरी करूं नये. जितकें धन उपटतां येईल तितकें उपटावें. निर्धन झाल्यावर नव्वा राणाजींना वाटत असल्यास मग त्यांचा कांटा काढावा.

**गणपत.**—असेंच करूं या. म्हणजे आजपर्यंत खाल्लेल्या मिठास जागल्यासारखें होईलही. दोन्हींकडून प्राप्ती उपटावयास ठीक होईल. (बाहेर गडबड होते तिकडे पाहून) बाईजी कोणीतरी येत आहे. मला वाटतें बहुतेक राणाजी येत आहेत. ह्या वेळीं आतां दुसरें कोणी येणार नाहीं. (ईश्वरसिंहजी व विद्याधर येतात).

**चंद्रावती.**—(उठून ताजीम देत) यावं, यावं महाराणाजी. किती दिवसांनीं तरी या गरीबाच्या झोंपडींत पायधूळ झाडलीत. आम्हीं वेड्यांनीं आपली पांखरासारखी वाट पहावी. बसा असे लोडाशीं. या प्रधानजी बसा. आज महाराणाजी व प्रधानजी या दोघांची मजसारखीवर कृपा झाली हें मोठं भाग्यच समजलं पाहिजे. शंकर, गणपत, महाराणाजींच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करा. त्यांना फार भूक लागली असेल. बरं तोंपर्यंत हें अमृत घ्या. (घुटीचे पेले भरून देते). घ्या प्रधानजी आपणही थोडा आस्वाद घ्या. (दोघेही पेले हातांत घेतात).

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—विद्याधर, कोटयावरील स्वारीचें नक्कीं झालें. हें फार चांगलें झालें. राजांना मजकडून आजवर कांहींच फायदा झाला नाहीं. अशा स्थितींत त्यांचें समाधान कसें रहावें ? (घोंट घेत) त्यांना कोठून तरी फायदा करून द्यावयासच पाहिजे होता. बरें, कोटयाच्या जालिमसिंहजीनें माधवसिंहजीच्या बाजूनें नुकतेंच आमच्या विरुद्ध शस्त्र उचललें. पराभव होऊन तो पळाला ही गोष्ट वेगळी. पण त्याची पुरती खोड अद्याप मोडली नाहीं, म्हणून त्यावर स्वारी करून खूप खंडणी उकळावी असें ठरविलें आहे. खंडणीचा जेवढा पैसा मिळेल तो सर्व राजांना द्यावयाचा.

**विद्याधर.**—ही गोष्ट आपण चांगली केली. शत्रूही नाहींसे व्हावेंत व मित्राचाही फायदा व्हावा, अशा दुहेरी योजनेची तारीफच करावयास पाहिजे. मात्र माधवसिंहजींचीं व होळकरांचीं कारस्थानें सुरू झालीं आहेत. इकडेही महाराणाजींनीं लक्ष पुरविलें पाहिजे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—कोटयाच्या स्वारीनंतर माधवसिंहजीचा पुरताच बंदोबस्त करावयाचा. चंद्रा, पुनः माधवसिंहजी व खंडेराव आले होते कां तुला त्रास द्यावयास ? मोठे व्यसनी व कारस्थानी आहेत बेटे.

**चंद्रावती.**—छे छे, त्या दिवशीं तुम्हांला व त्या शिंदेरावांना पाहून जे घाबरले ते पुन: इकडं त्यांनीं पाऊल ठेवलं नाहीं. मेलीं मोठीं वाईट माणसं. कसली पापी नजर त्या दोघांची. त्यांना पाहिलं कीं मला बाई भीति वाटते.

**शंकर.**—महाराज, मला तर त्यांचा इतका तिटकारा येतो कीं त्यांची चांगली खबर घ्यावीशी वाटते. पण मोठमोठीं माणसें पडलीं. लहान माणसांना स्वस्थ रहावें लागतें. आपण आज्ञा दिली तर मग करूं तितकेंही.

**गणपत.**—मला पुष्कळ वेळां वाटतें कीं त्यांना खूप घुटी पाजावी व असें दोघांचें आंग रगडून काढावें कीं दुसरे दिवशीं त्यांना हालतांही येऊं नये.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—तुम्हीं कोणीही त्यांना अपाय करूं नका. त्यांचे बेत काय आहेत ते काढून घेऊन मला कळवीत जा. त्याबद्दल तुम्हांला खूप इनामें देईन. शंकर, गणपत, तुम्हीं जा आणि कांहींतरी खाण्याची तयारी करा. (दोघे आंत जातात).

**चंद्रावती.**—महाराणाजी, पहिले आलेल्या वेळीं त्यांच्या बोलण्यांत एक गोष्ट मोठी महत्त्वाची आली होती. राजे शिंदेरावांवर अहिल्याबाई व आपल्या मोठ्या महाराणीसाहेब फार प्रेम करतात म्हणे. अलीकडे मीही थोडी चौकशी ठेवली तर त्या दोघीही राजांना भेटतात. मग कसले बेत करतात कोण जाणं. बाकी ते दिसतात अगदीं कृष्ण भगवान ! त्यांना अशा मोठमोठ्या खाशा स्वाऱ्या गोपी मिळाल्या तर नको कां आहेत ?

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—चंद्रा, कांहींतरी भलतं शब्द खाशा स्वाऱ्यांबद्दल बोलूं नयेत. त्या दोघीहीं साध्वी आहेत. समजलीस? आपल्यासारखंच सगळें जग असतें अशी तुझी कल्पना आहे काय ?

**चंद्रावती.**—पर्यायानं आपण मला हलकट म्हटलं, पण ध्यानांत ठेवा मीच आपल्या उपयोगी पडेन. आमचं आपलं वेडं प्रेम ! कितीही प्रामाणिक राहिलं तरी कलावंतीण ती कलावंतीण ! (डोळ्यांना पदर लावते). हृदयापासून प्रेम केलं तरी आपल्यासारख्या मोठ्या लोकांचीं आम्ही खेळणींच ! घ्यावीं व वाटेल तेव्हां फेंकून द्यावींत.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—हं ! अशी रडूं नकोस. तुझ्यावर माझा पूर्ण भरंवसा आहे. तूं माझी पहिल्यापासूनच आवडती आहेस. पण तूं काय म्हणाली होतीस ? महाराणी राजांना भेटते ? (विचार करीत) विद्याधर, अशी महाराणींचीं कोणतीं कामें असावीं बरें ! राजे शिंदेराव तर फार थोर गृहस्थ आहेत. महाराणीही थोर व सभ्य आहेत. मग काय असावें हें ! बरें महाराणींचें प्रेमही मजवर निस्सीम आहे. मग काय असावें ?

**विद्याधर.**—महाराणाजी, संशयाचें कांहीं कारण नाहीं. दोघेही खाशीं माणसें आहेत, हें ध्यानांत ठेवा. दोघांच्या बाबतींत संशयास थोडीसुद्धां जागा नाहीं. आपलें व राजांचें बंधुत्वाचें नातें असल्यानें त्यांनींही ओळख करून घेतली असावी इतकेंच. बरें ओळखपाळख झाल्यावर जाणीं-येणीं चालावयाचींच. त्यांत वाईट गोष्ट काय आहे ? शिवाय आपणांस संशयच असला तर महाराणींना आपण समक्ष विचारूं शकता. मात्र भलत्याच संशयाला जागा देऊं नये, अशी माझी आपणांस विनंति आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—विद्याधर, पहिला संशय या चंद्रावतीबद्दल माझ्या मनांत निर्माण झाला. माधवसिंहजी व खंडेराव ह्यांनीं हिला घेरलें आहे असें सारखें मनाला वाटतें. आतां

महाराणींचा मोठा विश्वास ! पण त्यांचा ओढा शिंदेरावांकडे पाहून पुनः महाराणींबद्दलही संशय दुणावला आहे. आतां त्या दोन राण्याही लवकरच येतील. त्याही अशाच प्रकारें संशयास्पद वागूं लागल्या म्हणजे सगळाच ग्रंथ आटोपला.

**विद्याधर.**—असें प्रत्येक बाबतींत जर आपण संशय घेत रहाल तर त्या संशयाला कांहीं ताळतंत्र राहणार नाहीं. संशयच घ्यावयाचा म्हटलां तर दुसऱ्या महाराणी व हरगोविंद ह्यांचा संशय आपणांस घेतां येण्यासारखा आहे. म्हणून हें संशयाचें वातावरण अजीबात नाहींसें करा, अशी महाराणाजींना विनंति आहे.

**चंद्रावती.**—(विद्याधराकडे डोळे मिचकावीत) हो संशयच घेत राहिल्यास त्याला आणखीही जागा आहे. आमचे विद्याधर प्रधानजी व तिसऱ्या राणीसाहेब ह्यांचंही सख्य जबरदस्त आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—काय म्हणतेस चंद्रा ? विद्याधरपंत ह्यांत कांहीं सत्य आहे कां ?

**विद्याधर.**—महाराणाजी, चंद्रा म्हणते त्यांत कांहींच तथ्य नाहीं. हं ! एवढें खरें कीं हरगोविंदचे व दुसऱ्या महाराणींचें सख्य आहे आणि माझें व तिसऱ्या महाराणींचें सख्य आहे. ह्याचा मतलब हा नाहीं कीं आपण सर्वांबद्दल संशयी बनावें ! महाराणाजी, विचार करा. संशय सगळा टाकून द्या. (चंद्रावती घुटीचा पेला भरून देते).

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—(पेला हातांत घेऊन) एकूण मीच संशयी. चंद्राचा ओढा माधवसिंह व खंडेरावाकडे ! महाराणींचा ओढा शिंदेरावांकडे ! (घुटी पीत) दुसऱ्या महाराणींचा ओढा हरगोविंदकडे व तिसऱ्या महाराणींचा ओढा विद्याधराकडे ! ज्यांना मी माझे म्हणतों त्या सर्वांचा ओढा दुसऱ्यांच्याकडे. माझ्याकडे कोणाचा ओढा आहे ? या महाराण्याला आपलें म्हणतां येईल असें कोण आहे ? वाऽरे दुनिया ! संशयाची दुनिया अजब आहे ! तिची माया अशी विचित्र आहे कीं तिच्यांतून सहीसलामत सुटून जाणें मुश्किल आहे. चंद्रा, विद्याधर, आज तुम्हीं हें काय केलेंत ? संशयाच्या जाळ्यांत तुम्हीं मला चांगलेंच फांसून टाकिलें आहे. (घुटी पीत) आतां या महाराण्याचें जीवित कसें विचित्र होईल ह्याचा नेम नाहीं. आप्तांबद्दल संशय, स्नेह्यांबद्दल संशय, मग विश्वास तरी कुठें ? छे छे, तुम्हीं आज भयंकर विष माझ्या मेंदूत ओतलें आहे. त्याचा आतां अंमल होऊं लागला. पुनः एकदां तुम्हांला विचारतों कीं तुम्हीं सरळ सरळ हकीकत असेल ती सांगाल तरच माझ्यांतील संशयपिशाच्च नाहींसें होईल.

**चंद्रावती.**—महाराणाजी, मजपासूनच आपण विचार करा. मी तर नायकीण. तेव्हां मजसंबंधीं हा विचार आपण जरूर ठेवला पाहिजे कीं मी बाजारची वस्तु. पैसेटक्के मोजावे व खरेदी करावी. आम्हीं कितीही निर्वाळा दिला तरी आमचा स्वभाव तो स्वभाव ! बरं, आतां तिन्हीं महाराणींचा विचार करा. पुरुषांच्या इच्छा व स्त्रियांच्या इच्छा सारख्याच असणार. तुम्हांला एकीच्या ऐवजीं उपभोगाकरितां चार स्त्रिया लागतात. उलट एकाद्या स्त्रीनं एकाच्या ऐवजीं दोन पुरुषांशीं प्रेम केलं तर वावगं कां वाटावं ?

**विद्याधर.**—चंद्राबाई, तोंड सांभाळ. काय बोलून राहिली आहेस? कांहीं बोलण्याला धरबंद आहे कां ? तूं कुणासमोर हें बोलत आहेस, ह्याची जाणीव तरी तुला आहे कां ? महाराणाजींच्या भावनांचा तूं कांहींतरी विचार करीत आहेस कां ? चंद्राबाई, सगळ्या ब्रह्माण्डाला आग लावण्याचा तुझा विचार आहे कां ?

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—विद्याधर, बोलूं द्या तिला. ती म्हणतें तें रास्त आहे. पुरुषांच्या जशा भावना तशाच स्त्रियांच्याही आहेत. आजवर माझी भूल होती. मी प्रत्येकाला माझें माझें म्हणून कवटाळीत होतों. आज माझ्यापुढें अगदीं उघडें नागडें सत्य उभें आहे. संशयी विचारानें एवढा फायदा जरूर झाला. स्वत:ची परिस्थिति डोळ्यांपुढें चक्क उभी राहिली. बरें तें असो. संशय मी काढून टाकला तर विश्वासपात्र कोण आहेत असें मी समजावें ?

**चंद्रावती**.—महाराणाजी होऊन कसले आपले हे कमकुवत विचार ! कुणी ऐकेल तर हसल्यावांचून रहाणार नाहीं. विद्याधर, सांगा समजुतीच्या दोन गोष्टी. दोन घटका मौजेंत घालवावयाच्या सोडून उगीच भलतेच विचार करीत मजा बिघडवून टाकलीत झालं.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—खरेंच, भलतेच विचार मी मनांत आणले. अधिक संशय घेईन तर राजा भर्तृहरीप्रमाणें वैराग्यशतक लिहिण्याची पाळी मला येईल. आतां असा विश्वास ठेवतों कीं माझे म्हणून जेवढे आहेत तेवढे सर्व विश्वासपात्र आहेत. इतकेंच काय पण प्रत्येक मनुष्य विश्वासपात्र आहे. तरच हें संशयाचें जाळें जळून खाक होईल.

**विद्याधर**.—महाराणाजी, आम्हीं सेवकांनीं आपणांला काय सांगावयाचें ? विश्वास ठेवावा पण बेसावध असूं नये, ही राजनीति आहे.

**चंद्रावती**.—शंकर, गणपत, अरे कांहीं खाण्याची तयारी केली कीं नाहीं ? (गणपत बाहेर येतो).

**गणपत**.—बाईजी, सगळी तयारी आहे.

**चंद्रावती**.—महाराणाजी, आंत चलावं. थोडं खाऊन पिऊन विश्रांति घ्यावी. उद्यां येथून मुक्काम हलावयाचा आहे. विद्याधर, तुम्हीं थांबतां काय ?

**विद्याधर**.—चंद्राबाई, मी आतां जातों. उद्यांच्या सैन्याच्या हालचालीची सर्व तयारी करावयाची आहे. महाराणाजी, मी आपली आज्ञा घेतों.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—ठीक आहे विद्याधर. तुम्हीं जा व उद्यांची सर्व तयारी व्यवस्थित करा. बिलकुल हयगय होतां कामा नये. गणपत, चल आंत.

**गणपत**.—यावं महाराज. (गणपत पुढें व महाराणाजी पाठीमागें असे जातात).

**चंद्रावती**.—कां या दासीवर एखादेवेळीं नाहीं कृपा करावयाची वाटतं. तिसऱ्या राणीसाहेबांचं सख्य लाभल्यावर ह्या चंद्राची काय जरूरी आहे म्हणा ! पण कधीं कधीं जरा हिचीही आठवण करीत जा. तुम्हीं प्रधानमाणसं. जरा तुमचीही निगा आमच्याकडं असली पाहिजे.

**विद्याधर**.—चंद्राबाई, महाराणाजींच्या डोक्यांत कसला संशय निर्माण केलास तूं. अग त्या तिसऱ्या राणींच्या संशयावरूनच ते माझें डोकें उडवतील कीं एखादे वेळेस ! किती घातक कल्पना सोडलीस तूं.

**चंद्रावती**.—अस्सं. मीच सोडली कां ? हरगोविंदचा कांहीं सूड घ्यावयाचा होता म्हणून वाटतं दुसऱ्या राणीसाहेबांबद्दल तुम्हीं संशय उत्पन्न केलात ? प्रधानजी, आमच्यासारख्यांनीं वाहत्या गंगेंत हात धुवून घेतला एवढंच. तुम्हींच सांगा या तिघींच्यावर विजय मिळवावयाचा कसा ? त्याशिवाय कां महाराणाजी माझे होऊन रहाणार आहेत ? हे झगडे चालावयाचेच. बरं मग एखाद्या दिवशीं करा कीं कृपा. जरा फुरसतीनंच या. बोलूं, बसूं, थोडी मौज करूं. इनाम मात्र भरपूर आणा हं !

**विद्याधर.**—चंद्राबाई, मी प्रधान असून मला हें कळत नाहीं कीं, हें काय होत आहे! पुढचा भविष्यकाळ मोठा भयंकर दिसतो आहे. आज महाराणाजींच्या मनांतील संशय थोडा कमी झाल्यासारखा वाटत असला तरी ज्याप्रमाणें इंगळावर राखेचे पडदे यावेत तशाच स्वरूपांत आहे. थोडा फुंकार मारतांच तो चेतून सर्व घरादाराची, राज्याची, राखरांगोळी केल्याशिवाय सोडणार नाहीं. बरें मी जातों. सर्वांच्या हिताकरितां राणाजींच्या मनांतील संशय तूं अजीबात काढून टाक.

**चंद्रावती.**—इनाम भरपूर मिळालं पाहिजे. संशय ताबडतोब मी दूर करीन. आपलं हें काम मी स्वीकारलं. इनाम चांगलं मिळालं पाहिजे मात्र.

**विद्याधर.**—माझ्याबद्दलचा संशय काढून टाकला तर इनाम भरपूर मिळेल. ठीक आहे. मी जातों.

**चंद्रावती.**—(हंसत) बरं तर या आतां प्रधानजी. (विद्याधर जातो) काय जगाचा न्याय आहे पहा! खासे खासे म्हणतां म्हणतां नीच माणसाप्रमाणंच गोष्टी करूं लागतात. ह्या महाराणाजीची व ह्या प्रधानजींची स्थिति पाहिली तर कींव येते त्यांची. प्रत्येकानं प्रत्येकास नांवं ठेवावीं ह्यापलीकडे दुसरं कांहीं नाहीं. प्रत्येकानं आपला स्वार्थ साधावा ह्यापलीकडे दुसरा मोक्ष नाहीं. मग वाटेल तें करावं लागलं तरी हरकत नाहीं. (शंकर येतो). काय रे शंकर, महाराणाजी पाटावर बसले कां?

**शंकर.**—बाईजी, चला कीं. ते तुमचीच वाट पहात आहेत कीं. आज तर खूप प्यालेले आहेत. आज काढतां कां त्यांचा कांटा. बाईजी, संधि तर चांगली आहे. कटकटच मिटेल व इनाम भरपूर मिळेल. आम्हीं काढूं मग दुसऱ्याचा कांटा! बोला, सर्व गोष्टी तयार आहेत.

**चंद्रावती.**—चुप शंकर. आत्तांच तसं कांहीं करावयाचं नाहीं. अरे बाबा, नवे राणाजी तरी जुन्याचे भाऊच! राज्यपद मिळालं कीं एकदम बदलून जातील व आपणांसच फांसावर लटकावं लागेल. सध्यां दुसरं कांहीं करावयाचं नाहीं. नुसतीं इनामं उपटावयाचीं. जितकं मिळेल तेवढं थोडंच. नव्या राणाजीला असंच झुलवीत रहावयाचं. जुन्या राणाजीला विश्वास दाखवीत मिळेल तेवढं उपटावयाचं. शेवटीं तें ठरलेलं आहेच.

**शंकर.**—बरें बाईजी, आपण म्हणतां तसें. चला आंत. महाराणाजी आपली वाट पहात आहेत.

**चंद्रावती.**—चल शंकर, महाराणाजींचा व्यवस्थित समाचार घेतला पाहिजे. (दोघे आंत जातात).

---

# अंक दुसरा.

## प्रवेश पांचवा.

( कोटाजवळील समरांगण —महाराणी व तिची दासी लढाईच्या पुरुषवेशांत प्रवेश करतात ).

**महाराणी.**—कला, लढाईला रंग तर खूपच चढला आहे. आपण बाजूला राहून ती लढाई पाहूं शकत आहोंत. म्हणून धास्ती वाटत नाहीं. मराठ्यांची लढण्याची शिकस्त आहे. जालिमसिंहाचं एवढं जंगी सैन्य पण त्याचा कांहीं इलाज चालत नाहीं. कोटाला वेढा घालून आज बरेच दिवस

झाले. जालिमसिंहाचे लोक बाहेर पडण्याची सारखी खटपट करीत आहेत. पण आमचे महाराणाजी व भावोजी आपआपल्या सैन्यांसह इतका निकराचा हल्ला करतात कीं त्यांना पुनः तटाच्या आंत जावं लागत आहे. कला, असली लढाई मी समक्ष कधीं डोळयानं बघितली नव्हती.

**कला.**—महाराज, आपण सावधच राहिलं पाहिजे. लढाईची रण-धुमाळी केव्हां इकडं येईल त्याचा नियम नाहीं.

**महाराणी.**—खरंच, आपण अशा ठिकाणीं आहोंत कीं इकडून सैन्याचा लोट येण्याचा संभव आहे. कला, मला महाराणाजींचा पराक्रम एवढा पहावयास मिळाला नाहीं. पण भावोजी म्हणजे सिंहच आहेत. मी रोज त्यांचा सारखा पराक्रम पाहून चकितच होतें आहे. महाराणाजी लढाईला जाण्यापूर्वी म्हणत होते कीं आज बहुतेक लढाईचा निकाल होईल. बरं होईल बाई! एकदां भावोजी विजयी झाले म्हणजे मी त्यांची विजयदीपानं ओंवाळणी करून त्यांच्या गळयांत विजयमाला घालीन. ती रम्य वेळ कधीं येते असं मला झालं आहे.

**कला.**—महाराज, जशी आपली श्रद्धा आहे तशी वेळ खात्रीनं येईल. भक्तिभावानं जी इच्छा करावी ती खात्रीनं सफल झाल्यावांचून रहाणार नाहीं. महाराज, जरा सावध व्हा. कोणीतरी इकडं येत आहे. (शंकर व गणपत लढाईच्या वेषांत येतात. त्या दोघी बाजूला लपून उभ्या राहतात).

**शंकर.**—गणपत, हा लढाईचा वेष कांहीं सोईचा नाहीं. गड्या हे शिपाईलोक तो कसा घालत असतील ते असो. आपण त्या शिंदेरावांवर सारखी पाळत ठेऊन आहों. पण संधि कांहीं मिळत नाहीं.

**गणपत.**—शंकर, शिंदेरावांचें काम काढल्याशिवाय तर रहावयाचें नाहीं. चंद्राबाई व माधवसिंह ह्या दोघांची इच्छा पुरी होऊन आपणांला सरदारकी मिळेल. शंकर, काय मजा होईल. महाराणा माधवसिंहजी आम्हांला तोडेवाले सरदार बनविणार आहेत. एकदां डाव मात्र साधला पाहिजे.

**महाराणी.**—(हळूच) कला, हेच ते पापी खिदमतगार बरं कां? महाराणाजींना चंद्रावतीच्या नादीं लावणारे हेच बरं कां ते!

**कला.**—(हळूच) महाराज, गडबड करूं नका. ते आपणाला ओळखतील चुप राहून त्यांचे बेत ऐकूं या.

**महाराणी.**—(हळूच) बरं बाई. पण त्यांच्या बोलण्यावरून भावोजींचा घात करण्यास ते हिंडत आहेत असं दिसतं.

**शंकर.**—गणपत, बंदुकीचा नेम तरी मारायला शिकला आहेस कीं नाहीं? तूं न्हावी व मी महात. लढाईच्या कामाला दोघेही अनोळखी. तुझी बंदूक तरी चांगली भरून ठेवली आहेस ना? नाहींतर शिंदेराव दिसावयाचे व तुझी बंदूकच उडावयाची नाहीं.

**गणपत.**—शंकर, तूंही मोठा अजब आदमी आहेस कीं. अरे, बेसावध माणसावर दुरून गोळी झाडणें काय अवघड आहे? बंदूक उडवतां आली म्हणजे झालें. मग गोळी कुठें कां लागेना. गड्या शंकर, आज वाटेल तें होवो शिंदेराव लढाईंत गुंतलेले दिसले कीं मी तर गोळी झाडणार.

**शंकर.**—मीही निश्चय केला आहे कीं शिंदेराव दिसले कीं गोळी झाडावयाची. (हिरा हुजऱ्याच्या वेषांत येऊन त्यांचें बोलणें ऐकत उभी राहते.) शिंदेराव चित्त झाले कीं दुहेरी इनाम द्यावयाचें. त्या दिवसाच्या महाराणींबद्दलच्या संशयापासून महाराणाजीसुद्धां शिंदेरावांवर नाराज आहेत.

**महाराणी.**—(हळुच) कला, ही आणखी निराळीच भानगड दिसते. आई जगदंबे, माझ्या भावोजींवरील संकट तूंच टाळ!

**कला.**—(हळुच) महाराज, गडबड करूं नका. हे दुष्ट मारेकरी बनून आले आहेत. ह्यांच्यावर चांगली नजर ठेऊन शिंदेरावांना वांचविलं पाहिजे.

**हिरा.**—(स्वतःशीं) शिंदेरावांना मारण्याकरितां हे इकडे आले आहेत. ताबडतोब जाऊन त्यांच्याकडच्या शिलेदारांना हळूच कळविलं पाहिजे. (आल्या बाजूनेंच घाईनें निघून जाते.)

**शंकर.**—गणपत, अरे त्या लढाईकडे तर पहा. कशी घनचक्कर चालू आहे. जालिमसिंहाच्या कडच्या राजपुतांची व शिंदेरावांच्या शिलेदारांची चांगलीच जुंपलेली दिसते. गणपत, या वेळीं जर एखादा हत्ती असतां तर त्यावर बसून छान लढाई पाहिली असती. पहा पहा, लोक इकडे पळूं लागल्याचें दिसतें आहे.

**गणपत.**—शंकर, राजपुतांचा रोजच्याप्रमाणेंच पराभव होऊन ते पळूं लागल्याचें दिसतें. पण किल्ल्यांत पळून जाण्याच्याऐवजीं आज इकडे जंगलाच्या बाजूस ते कां पळत आहेत? मला वाटतें जालिमसिंहाची कांहींतरी चालबाजी दिसते.

**शंकर.**—गणपत, कांहीं असो. आपण तयार राहूं या. जंगलाच्या या बाजूनें शिंदेराव जाऊं लागतांच दोघांनीं गोळया झाडावयाच्या हे ध्यानांत ठेव.

**गणपत.**—शंकर, मीही तेंच म्हणत होतों. अगदीं तयारींत राहूं या हं.

**महाराणी.**—(हळुच) कला, आपणही तयार राहूं या. यांनीं नेम धरतांच त्यांच्यावर तुटून पडावयाचं व त्यांच्या बंदुकी जमीनीवर पाडावयाच्या. आपले प्राण गेले तरी हरकत नाहीं. भावोजींच्या जिवाला मात्र धक्का लागूं द्यावयाचा नाहीं.

**कला.**—(हळुच) महाराज, मी ह्या गणपतवर झडप घालतें. तुम्हीं शंकरवर घाला. अगदीं तयार असा, जें होणार तें होवो पण शिंदेरावांचे प्राण तर वांचवावयाचेच. महाराज, आपण जरा सावधगिरीनं रहा बरं. मेले दोघेही मांग, कसाई आहेत नुसते!

**शंकर.**—गणपत, ती पाहिलीस पुनः जालिमसिंहाची व शिंदेरावांची जुंपली. काय जोरकस लढाई चालली आहे. तरवारीचे व पट्टयाचें हात करण्यांत शिंदेरावांची कोणी बरोबरी करणार नाहीं. वाहवा! जालिमसिंहजी तूंही बहाद्दर खरा. खूप नेट धरला आहेस. वाहवा! दोघेही वीर आहेत बरं कां.

**गणपत.**—काय रे, शौर्याच्या फार गोष्टी बोलूं लागला आहेस? आपलें मुख्य काम विसरशील बरें. अरे बाकीचे रजपूत तर पार पळाले. जालिमसिंह व त्याचे निवडक लोक व शिंदेराव व त्यांचे शिलेदार तेवढेच लढत आहेत. अरेरे, जालिमसिंहजी व त्याचे साथीदार पळत सुटले. शंकर, ते इकडच्या बाजूसच येत आहेत. हं! समोर येतांच गोळ्या झाडावयाच्या ध्यानांत ठेव. सावध!

**शंकर.**—गणपत, गणपत, शिंदेराव आतां गोळीच्या टप्प्यांत येत आहेत. बघ, तयार हो.

**महाराणी.**—(हळुच) कला, तयार रहा!

**कला.**—(हळुच) महाराज, हुषार!

(शिंदेरावांवर नेम धरून दोघेही घोडा ओढूं लागतात. इतक्यांत महाराणी शंकरच्या अंगावर झडप घालून बंदुकीचो दिशा बदलते. आवाज होतो. पण गोळी चुकते. कला व गणपत ह्यांची

झटपट होते. तो तसाच नेम धरून बंदूक उडवितो. गोळी शिंदेरावांच्या हातास चाटून जाते. हिरा दोन शिलेदारांसह पकडा पकडा म्हणून ओरडत धांवत येते, तोंच दोघेही बंदुकी टाकून पळून जातात. त्यांच्यामागें महाराणी व कला घाईनें जातात. हिरा व शिलेदार तसेच पाठोपाठ निघून जातात. नंतर पडदा उघडतो. महाराणी (पुरुषवेशांत) शिंदेरावांच्या हातास पट्टी बांधत आहे. शिंदेराव एका शिळेवर बसून विश्रांति घेत आहेत. शेजारी कला व हिरा पुरुषवेशांत असून जखम बांधण्यास मदत करीत आहेत.)

**राजे जयाजीराव.**—सुंदर तरुणा, धन्य आहे तुमची. स्वतःचे प्राण धोक्यांत घालून तुम्हीं आम्हांला वांचविलें. ईश्वरानेंच आपणांला पाठविलें. आम्हीं आपले उपकार कसे फेडावें?

**महाराणी.**—(आनंदानें) छे, भलतंच कांहींतरी. आम्हीं यांत कसले उपकार केले आहेत? आपण संकटांत दिसला; वाटलं आम्हांला तुम्हांला मदत करावी! प्राणावर संकट बेतलं होतं आपल्या, तें फक्त हातावर गेलं. या माझ्या मित्रानं वांचविण्याचीजी धडपड केली ती यशस्वी झाली नाहीं. म्हणून गोळी हाताला लागली. ईश्वरानं खैर केली. चला आतां आपल्या छावणींत. अशा स्थितींत इथं राहणं योग्य नाहीं. एखादे वेळीं शत्रूची पळालेली फौज पुनः एकत्र व्हावयाची.

**राजे जयाजीराव.**—राजपूत सैन्य पळालें पण त्या जालिमसिंहाचें काय झालें? गोळी लागतांच थकव्यानें मला थोडी भोंवळ आली. त्यांत कांहीं समजलें नाहीं.

**महाराणी.**—आपल्या शिलेदारांनीं जालिमसिंहजीचा पाठलाग केला. त्याच्याजवळ अगदीं थोडे लोक होते. बहुतेक तो गिरफतार झाला असेल.

**हिरा.**—होय सरकार, शिलेदारांनीं त्यास गिरफतार केलं असून मराठे व जयपुरच्या फौजा सर्व छावणींत गोळा होत आहेत. कदाचित् आपल्या शोधास कोणी इकडं येतील. तरी आपण लवकरच तिकडं गेलेलं बरं. (शंकर व गणपत ईश्वरसिंहजीस बरोबर आणून तें दृष्य दाखवितात).

**शंकर.**—महाराणाजी, ओळखलेंत कां शिंदेरावांची जखम कोण बांधीत आहेत?

**गणपत.**—(हळुच) सरकार, कशा गुलगुल गोष्टी होऊन राहिल्या आहेत. हीं असलीं बेइमानीचीं दृष्यें आम्हांला पहावलीं नाहींत, तर चाकरांचा गुन्हा आहे कां? उद्यां आपणच आम्हांला फांसावर लटकऊं पहाल. पहा पहा, एकदां उघड्या डोळयांनीं पहा. पुरुषवेषांतील महाराणीसाहेबांना तर आपण खास ओळखलें असेलच.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—(हळुच) अरे मुळींच गडबड करूं नका. या वेळीं कांहीं ओळख द्यावयाची नाहीं. आपलें काम झालें आहे चला. (तिघेही निघून जातात.)

**महाराणी.**—तुम्ही दोघी पुढं चला. मी यांना हळुहळू धरून तिकडं आणतें. कोणी माणसं भेटलीं तर चटकन् एखादी पालखी मागवून आणा. (दोघी जातात.) आपण पूर्ण सावध होऊन बोलूं लागेपर्यंत माझ्या जिवांत जीव नव्हता. महाराज, ईश्वराची कृपा मोठी म्हणूनच हा प्रसंग टळला. (शिंदेराव उठून बसतात) आपणांला श्रम होत नसतील तर माझा आधार घेऊन हळुहळू आपण छावणीकडे चालत जाऊं.

**राजे जयाजीराव.**—बहाद्दर तरुणा, तूं इतका कोमल असून तुझें धैर्य अलोट आहे. माझे प्राण वांचवून तूं मजवर अनंत उपकार केले आहेस. याबद्दल मी तुझे उपकार फेडूं शकत नाहीं. पण माझ्या हाताखालीं पहिल्या प्रतीचा सरदार म्हणून मी तुझी आजपासून नेमणूक करतों. तुला कायमची एक लाखाची जहागीर देतों. ती वंशपरंपरा तुझ्याकडे राहील.

**महाराणी.**—जयपुरच्या राज्यापुढं आपल्या एक लाखाच्या जहागिरीला महत्त्व नाहीं. आपण आम्हांला पहिलंच इतकं देऊन ठेविलं आहे कीं सात जन्म आम्हीं आपली सेवा केली तरी ती अपुरीच होणार आहे. राजे, आपण मला ओळखलं नाहीं.

**राजे जयाजीराव.**—(न्याहाळून पाहून) कोण महाराणी? वहिनी, तुम्हीं माझे प्राण वांचविले? (पाया पडतात) माऊली, किती कष्ट घेतलेंत आपण!

**महाराणी.**—भावोजी, आपल्या गुणांनीं आम्हांला सदैव ऋणी केलं आहे. आपण आमच्या-वर अनेक उपकार केले त्यामुळं विशेषत: आमच्यामुळं आपल्याला अनेक शत्रु निर्माण झाले आहेत. रात्रंदिवस माझ्या भावोजींला त्यांच्यापासून अपाय होऊं नये म्हणून अशी वेष पालटून किंवा अन्य मार्गानं आपल्या जिवाची राखण करीत असतें. माझ्या दासी व मी नेहमीं आपल्याच विवंचनेंत असतों.

**राजे जयाजीराव.**—पूर्वजन्मीच्या आमच्या मातोश्रीच आपल्या रूपानें आमच्या जिवाची चिंता वहावयास मिळाल्या म्हणावयाचें! वहिनी, माझ्यावर गोळी झाडणारे ते कोण होते व त्यांचा पत्ता तुम्हांला कसा लागला?

**महाराणी.**—भावोजी, युद्ध चालूं झाल्यापासून मी व माझ्या एका दासीनं रोज या प्रकारचा लष्करी पुरुषपोशाख चढवून ती वरची उंचवटयाची जागा आहे तिथं जाऊन बसावयाचं असं चालूं ठेविलं होतं. लक्ष सर्व महाराणाजी व आपण इकडंच रहावयाचं! आज तिथं जाऊन बसतों न बसतों तों ते चंद्रावतीचे दोन साथीदार हातांत बंदुका घेऊन आले. आम्हीं बाजूला लपून राहिलों. त्यांनीं नेम धरतांच आम्हीं दोघींनीं त्यांच्यावर झडप घातली. हेतु असा कीं निशाणाची दिशा बदलावी व आपले प्राण वाचावे. ईश्वरानं दया केली व माझ्या भावोजींचे प्राण वांचले.

**राजे जयाजीराव.**—माऊली, धन्य आहे तुमची! ईश्वर आपलें सदैव कल्याण करो.

**महाराणी.**—(विनोदानें) एक जो पदरीं पडला आहे तो सर्व दृष्टींनीं सुधारून मला परत मिळाला म्हणजे माझं सार्थक झालं. पतिदेवापेक्षां आणखी दुसरा कोणता देव आमच्यासारख्यांचं कल्याण करणार आहे? भावोजी, तो पतिदेवच आपल्या आशीर्वादानं प्रसन्न राहिला म्हणजे मला सर्व कांहीं लाभलं. जयपुरची प्रजाही रात्रंदिवस हेंच चिंतीत आहे.

**राजे जयाजीराव.**—(हंसत) हं हो जरूर? वहिनी, आमचे जयपुरचे ईश्वर सर्व प्रकारें आपल्यावर खुष होतील. आमच्यासारख्या त्यांच्या पगडभाईचे आपण प्राण वांचविले हें कळल्यावर त्यांना किती किती खुशी होईल? वहिनी, चला. मला आतां चालण्याची ताकद आली आहे. (उठून चालूं लागतात). राजपूत कुळांतील अनेक शूर स्त्रियांची आज आपण आठवण करून दिली. वहिनी, आपल्यासारख्या स्त्री-रत्नांनीं राजपूत वंश नेहमींच भूषित होतात. जयपुरच्या राजवंशांत आपली कीर्ति अमर होऊन राहील!

**महाराणी.**—हं! पुरे करा आतां. आतां बरीच स्तुति सुरूं झाली. गौरव करण्याची थोडी मर्यादा असते. आमचं कर्तव्य आम्हीं केलं. ईश्वरानं त्याला यश दिलं. आतां आमच्या तंबूंतच चलावयाचं. मी तिथं महाराणाजींना बोलावतें. हकीमाकडून हाताची जखम बांधून तिथंच गोड गोड पक्वान्नं करून आज सर्व मिळून आनंदानं भोजन करूं. भावोजी, आतां आपण आमच्याकडंच आलं पाहिजे.

**राजे जयाजीराव.**—ठीक आहे. तिकडेच चलूं. तिथेंच त्या जालिमसिंहाला आणून कोटा-प्रकरण आजच मिटवून टाकूं. या जयपुरप्रकरणांत गुंतल्यापासून आमच्या तिकडील कामांत पुष्कळ

घोटाळे उडाले आहेत. आपल्या इच्छेप्रमाणें जयपुरला आतां कोणी शत्रु उरले नाहीं. मेवाडाधिपति, माधवसिंहजी व जालिमसिंहजी ह्या तिघांचा आतां पुरता बंदोबस्त झाला आहे. महाराणाजींची व आपली इच्छा पुरी झाली आहे. दोघेही आतां सावधपणें राज्य करून आपल्या प्रजेला सुखी करा.

**महाराणी**.—भावोजी, महाराणाजींचं डोकं फार विचित्र आहे. आपण सर्व व्यवस्था उत्तम करीत आहांत पण देव जाणं; महाराणाजी आपण गेल्यावर काय करतील कोण जाणं! (महाराणा ईश्वरसिंहजी व हरगोविंद येतात) पाहिलंत, महाराणाजी इकडंच येत आहेत.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—शिंदेराव, तुम्हीं इतका वेळ कुठं होता. हाताला काय जखम झाली आहे? हे सरदार कोण?

**राजे जयाजीराव**.—भैय्याजी, कोण आहेत तें सांगावयाचें नाहीं असा हुकूम झाला आहे. ह्याच सरदारांनीं आम्हांला वांचविलं व आमच्या हाताची जखम बांधली. मोठे चांगले आहेत हे सरदार! आणि आश्चर्य हें कीं हे तुमचे आहेत!

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—(हंसत) वा! आमचे आहेत? आम्हीं तर ह्यांना नाहीं ओळखलें. ह्यांनीं आपले प्राण वांचविले ह्याबद्दल ह्यांना फार मोठें इनाम दिलें पाहिजे.

**हरगोविंद**.—हो हो सरकार. अशा बहाद्दराला इनाम जरूर दिलेंच पाहिजे.

**राजे जयाजीराव**.—आमच्या ह्या प्राणदात्यास आपण ओळखलें नाहीं. ह्यांनीं आम्हांला व आपणांस जेवणाचें आमंत्रण दिलें आहे. आपण ह्या सरदाराच्या व आमच्या विनंतीस मान द्यालच. तिथें गेल्यावर आपण जी शाबासकी किंवा जे इनाम देऊं इच्छितां ते देऊं शकतां? चला आम्हीं तिकडेच जात आहोंत.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—(हंसत) ठीक आहे. आपलें व आपल्या प्राणदात्याचें आमंत्रण आम्हीं स्वीकारलें. बरें, आतां जालिमसिंहजी पकडला गेला आहे. त्याचें राज्य खालसा करावयाचें किंवा कसें? त्याचा निकाल लावूं व लागलीच छावण्या येथून हलवूं. आपल्या हाताची जखम फार नाहीं ना?

**राजे जयाजीराव**.—तशी म्हणण्यासारखी जबर नाहीं. आमचा विचार असा कीं, जालिमसिहजीजवळून खूप मोठी रक्कम घ्यावी व त्यास सोडून द्यावें. हरगोविंद, कोटयाचें राज्य खालसा करणें कांहीं योग्य होणार नाहीं. कारण तोही राजपूत आहे. त्याला आपण मित्र करून घेतलें पाहिजे.

**हरगोविंद**.—होय सरकार. आपलें म्हणणें बरोबर आहे. जितकी रक्कम मिळेल तितकी वसूल करून घ्यावी व त्यास सोडून द्यावें. तो आपल्या बाजूस कायमचा आला तर एक प्रकारें मोठी मदत होईल.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—राजे, आमच्या या युद्धांत आपणांस कांहींच मिळालें नाहीं. तो जर पन्नाससाठ लाख रुपये आपणांस देईल व आमचा मित्र म्हणून राहील तर आमची हरकत नाहीं.

**राजे जयाजीराव**.—महाराणाजी, उद्यां आमचीं सैन्यें उज्जैनकडे कूच करतील. आम्हांला आतां यापुढें आपल्याकडे राहतां येणार नाहीं. जालिमसिहजी जेवढी खंडणी देईल तेवढी आम्हीं घेऊं. यापुढें आपण जयपुरचा राज्यकारभार व्यवस्थित चालवा. हरगोविंद, आतां जयपुरला शत्रु म्हणून कोणी उरलें नाहीं. तुम्हीं प्रधानमंडळानें महाराणाजींना योग्य सल्लामसलत देऊन उत्तम राज्यकारभार

चालवा. जयपुरची सुस्थिति आम्हीं चाहतों. हें राज्य उत्तम चालून हिंदवीस्वराज्यास तुमची पूर्ण मदत झाली पाहिजे. महाराणाजी, आपल्या पूर्वजांची आठवण ठेवा. हिंदुपदपातशाहीकरितां त्यांनीं प्राणांच्या आहुती दिल्या आहेत. हें ध्यानीं आणा व पुढील उद्योग त्या दिशेनेंच चालवा. (कंठ दाटून) आपला स्नेह, आपल्या महाराणीसाहेबांचे अकृत्रिम प्रेम, हीं आम्हांला जन्मभर याद देत राहतील. आमच्या जिवाकरितां स्वतःचे प्राण कुरबान करण्यास तयार होणाऱ्या आत्म्यांची थोरवी आम्हांला केवढी वाटत असेल त्याची कल्पना करा. आपण व महाराणीसाहेब जेव्हां जेव्हां बोलावतील तेव्हां तेव्हां येऊन मी माझें कर्तव्य बजावीन. महाराणाजी, माझ्याच्यानें अधिक बोलवत नाहीं माझ्यावर आपण दयालोभ ठेवा.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—(गहिंवरून) थोर पुरुषा, मी आपल्यापुढें एक यःकश्चित प्राणी आहे. महाराणापदावर आहे म्हणूनच माझी योग्यता ! थोर मनुष्य, पुण्यात्मा, वगैरे विशेषणें फक्त आपणांसच लागूं शकतात. माझीं पातकें रात्रंदिवस माझ्या डोळ्यापुढें नाचत आहेत व तीं मला कधीं गिळंकृत करतील याचा नियम नाहीं. राजे, माझ्या मनाचा कमकुवतपणा इतका आहे कीं मला सर्व गोष्टी कळत असून सुधारणा करतां येत नाहीं. राजे, मी अगदीं नादान आहे. आतां आपला वियोग होणार ! कुणी सांगावें कदाचित् तो कायमचाच तर होणार नाहीं ? मला माझा स्वतःचाच भरंवसा वाटत नाहीं. राजे, भविष्यकाळ मोठा भयंकर आहे.

**राजे जयाजीराव**.—माणसानें पश्चात्तापपूर्वक सुधारण्याची खटपट केली तर यश मिळतेंच मिळतें ! आपण तशी खटपट करा. ईश्वर आपणांस साहाय्य करील. आपल्या महाराणी साध्वी आहेत. त्यांच्या सल्यानें वागा. राजाला सावधगिरी, धैर्य, शौर्य हे गुण नेहमींच लागतात. माझी खात्री आहे, आपण त्या दृष्टीनें खटपट केल्यास फार लवकर आपणांस यश मिळेल !

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—हा उपदेश मी सतत ध्यानांत ठेवीन. चला आतां आपल्या सरदारसाहेबांकडे भोजनास जाऊं.

**हरगोविंद**.—महाराणाजी, किती अमोल उपदेश आहे राजांचा ! आपण याप्रमाणें वागून जयपुरराज्याचे व पर्यायानें हिंदवीस्वराज्याचें सर्वश्रेष्ठ राजकारण यशस्वी करा.

**राजे जयाजीराव**.—(हंसत) हो चला. महाराणाजी, आमचे सरदारसाहेब सर्व व्यवस्था ताबडतोब करतील. चला मंडळी.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—चला राजे. (सर्व जातात.)

---

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

(जयपुरचीं सुभेदार मल्हारराव होळकरांची छावणी--अहिल्याबाई, गंगाधरपंत बोलत बसले आहेत व हिरा जवळ उभी आहे. )

**अहिल्याबाई.**--पंत, भावोजींकडून पत्र आलं कीं नाहीं ? ते इकडं कधीं येणार वगैरे अद्याप कांहींच कळत नाहीं. बिचाऱ्या महाराणीनं त्यांचा सारखा धांवा चालू ठेविला आहे. पंत, तुम्हीं हिताचीं माणसं म्हणून इतकं तरी मला मोकळ्या मनानं बोलतां येत आहे.

**गंगाधरपंत.**--बाईसाहेब, मी आपला दास आहे. खाल्लेल्या अन्नाला जागून धन्याचें हित पहाणें हेंच आमचें काम !

**अहिल्याबाई.**--होय, मामंजींचाही आपल्याबद्दल असाच समज आहे. जयपुरच्या पहिल्या युद्धापासून आमच्या घरच्या मंडळींला त्या माधवसिंहजीनं व्यसनी बनविलं. मामंजींना त्यानं भलत्याच रस्त्यावर नेलं आहे. त्यामुळं भावोजी व मामंजी यांचीं मनं बिलकुल साफ नाहींत. या हिरानं गेल्या वेळीं समक्ष पाहिलं कीं भावोजींचा घात करण्याकरितां त्या माधवसिंहजीनं प्रत्यक्ष मारेकरी घातले. बिचारे दैवानं म्हणून प्राणावर आलेलं तें नुसतं हातावर गेलं.

**गंगाधरपंत.**--बाईसाहेब, मागच्या आठवणी काढून उगीच कशाला दुःख करावयाचें ? सुभेदारांचें तरी शिंदेरावांबद्दल वाईट मन कुठें आहे ? शिंदेराव बिचारे साधे, सरळ, एकवचनी व एकमार्गी शूर पुरुष. त्यांच्या आंत-बाहेरच्या गोष्टी वेगवेगळ्या नसतात.

**अहिल्याबाई.**--त्यांच्या बाबतींत पेशवे व आमचे मामंजी यांनीं भयंकर अन्याय चालविलेला आहे. प्रथम सर्वांनीं मिळून जयपुरगादीचा खरा वारस ईश्वरसिंहजी ह्याची बाजू घेतली. मराठेशाहीच्या इभ्रतीकरितां जिवाचीही पर्वा न करितां सर्वांनीं ईश्वरसिंहजीची बाजू यशस्वी केली व मराठ्यांचा बोलाला सर्व उत्तर हिंदुस्थानांत झाला. दिल्लीच्या बादशहानंसुद्धां मराठ्यांची तारीफ केली. राजपूत, जाट, पठाण, रोहिले व मोंगल लोकांत आमचा केवढा मोठा दरारा निर्माण झाला ! हें सर्व श्रेय माझ्या भावोजींनाच होतं.

**गंगाधरपंत.**--बाईसाहेब, पण पेशव्यांना व सुभेदारांना पुष्कळ पैसा पाहिजे होता. तो माधवसिंहजींकडून मिळत होता; म्हणून सुभेदारांनीं त्याला हातीं धरलें. यांत काय बिघडलें ?

**अहिल्याबाई.**--पंत तुमच्यासारख्या मुत्सद्यांनीं असा विचार करावा हें नवल वाटतं. पैशासाठीं मराठे वाटेल तें करतात हा दुर्लौकिक किती वाईट आहे ! ही गोष्ट भावोजींना पसंत नव्हती. कोटच्याच्या स्वारींत भावोजींना मोठी खंडणी मिळाली ती वाजवी होती. जयपुरच्या पहिल्या स्वारींत त्यांना कांहींच मिळालं नव्हतं. या निमित्तानं चिडून जाऊन मामंजींनीं माधवसिंहजीस पेशव्यांपर्यंत पोहोंचविलं. पासष्ट लाखांचा मोह माधवसिंहजीनं त्यांना दाखविला होता. ते तरी मिळाले कां ? उगीच भावोजींच्या मनांवर भलताच आघात केला मात्र. पंत, माझे भावोजी मराठ्यांच्या दानतीचा विचार करतात तर पेशवे व मामंजी फक्त पैशाचा विचार करतात.

**गंगाधरपंत.**--बाईसाहेब, सुभेदार व शिंदेराव ह्या दोघांचीही बाजू पेशव्यांनीं ऐकून घेतली. शिंदेरावांचा सत्पक्ष होता. पण व्यवहारांत त्याला कोण विचारतो ? बाईसाहेब, 'बळी




४. खंडेराव :- पंत, मुजरा करा. अहिल्या या मुतालीकाला, मराठयांच्या उत्तरे कडील सेनापतीला मुजरा करा!

तो कान पिळी' ही म्हण नेहमीं खरी ठरते. ईश्वरसिंहजीचा सत्पक्ष असला तरी पण तो स्वतः व्यसनी, भित्रा, कमकुवत व नादान असल्यानें जयपुरचें राज्य त्याला सांवरता येईना. दिल्लीच्या बादशहानें त्याला सरदारकी दिली. दुआबांतील अलीअहमद पठाणाशीं लढण्यास पाठविलें. पण तेथून पळून येऊन तो जयपुरांत लपून बसला व त्यानें आपला बदलौकिक केला. त्यावरून बादशहा, पेशवे व सुभेदार हे तिघेही त्याच्याशीं नाराज झाले; मग एकट्या शिंदेरावांनीं त्याची बाजू घेऊन काय उपयोग ?

**अहिल्याबाई**.—तो कितीही नादान असला तरी त्याला सांवरण्याचं काम मराठ्यांचं आहे, हें मत आमच्या भावोजींचं. शिवाय मराठे जी बाजू धरतात ती कायम असते, ही कीर्ति त्यांना पाहिजे होती. पैशापेक्षां अब्रूला किंमत अधिक आहे, पंत !

**गंगाधरपंत**.—बाईसाहेब, आपण एकतर्फी विचार करतां. दोन्ही सरदारांतील दुमत नाहींसें करण्याकरितां पेशवे स्वतः नेवाईस आले ना ? दोन्ही पक्षांचीं मनें साफ करण्याकरितां पेशव्यांनीं माधवसिंहजीस चार परगणे आणि चोवीस लाख रुपये द्यावे व राज्य ईश्वरसिंहजींकडे रहावें असें ठरविलें ना ? मराठ्यांना पंधरा लाख रुपये ईश्वरसिंहजीनें द्यावें असेंही ठरलें. आतां दोन्ही पक्षांची समजूत व्हावयास पाहिजे होती. पण अजून तरी ती झाली आहे कां ?

**अहिल्याबाई**.—पंत, ईश्वरसिंहाचे चार परगणे, चोवीस लाख रुपये व मराठ्यांकरितां मागितलेले पंधरा लाख रुपये ह्याला कांहींच कां किंमत नाहीं? जयपुरराज्याचं केवढं मोठं नुकसान आहे ! हें ! त्या बिचाऱ्यानं एवढा बोजा कसा सोसावा ? भावोजी बिचारे समजूतदार आहेत म्हणून प्रत्येक गोष्ट ते ऐकून घेतात. पुणें मुक्कामीं असतांना पेशव्यांनीं मोठी मेजवानी केली. त्यांत दोन्ही सरदारांस खुद्द विश्वासराव पेशव्यांनीं आमंत्रण दिलं. पुष्कळ दिलसफाईचीं बोलणीं झालीं. पण भावोजींच्या मनाचे औदासीन्य बिलकुल नाहींसं झालं नाहीं.

**गंगाधरपंत**.—बाईसाहेब, मी थोडें आपणास विचारूं कां ? भावोजींना समजविण्याचा वहिनींनीं कांहींच प्रयत्न केला नाहीं कां ?

**अहिल्याबाई**.—(हंसत) पंत, आम्हीं बायका माणसं काय करणार ? ते बिचारे माझ्या सांगण्याबाहेर केव्हांही जात नाहींत. त्यामुळं मी सारखी चिंता करीत आहे. इकडील राजकारण भयंकर चिघळलं आहे. ईश्वरसिंहजी काय किंवा माधवसिंहजी काय, हे दोघेही मराठ्यांना आतां शत्रु लेखीत आहेत. याला कारण आमचे आम्हींच आहोंत. मामंजींनीं पगडीबदल केल्यापासून मराठी राजकारणाचा बोजवारा उडाला आहे. पंत, तुम्हीं मुत्सद्दी आहांत. आमच्यापेक्षां तुम्हांला अधिक समजतं.

**गंगाधरपंत**.—बाईसाहेब, आपल्यासारख्या बुद्धिवान, नेकमार्गी, राजकारणी व साध्वी-सतीपुढें आमचे मेंदू व लेखण्या काय काम देणार ? (खंडेराव होळकर येतात. ते घुटी प्यालेले असतात. अहिल्याबाई व पंत उठून उभें राहतात. खंडेराव लोडाशीं लोळतात).

**खंडेराव**.—पंत, मुजरा करा. अहिल्या, आतां या मुतालिकाला, मराठ्यांच्या उत्तरेकडील सेनापतीला, सर्वांनीं मुजरा करावा.

**अहिल्याबाई**.—छे बाई, हें काय आज नवीन सोंग ? काय पुनः पिऊन आलांत ? पंत, आतां मात्र हद्द झाली बाई ! त्यांना या व्यसनापासून दूर करण्याकरितां आणि नीट वळण लावण्याकरितां

म्हणून मामंजींनीं आपणाला देखरेखीवर नेमिलं. मीही आपल्यावर पूर्ण भरंवसा टाकला आणि कांहींच सुधारणा न होतां पूर्ववत् हे पिऊं लागले. मग आजवर तुम्हीं काय केलं ?

गंगाधरपंत.—बाईसाहेब, मी सारखा डोळयांत तेल घालून त्यांच्यावर नजर ठेवतो. आजवर कांहीं त्यांना संधि मिळाली नाहीं. आज हे गांवांत जातों म्हणून गेले व असे तर्र होऊन आले.

अहिल्याबाई.—हिरा, तूंही नजर ठेविली नाहींस ? मला कांहींच कळविलं नाहींस ?

हिरा.—सरकार, तें सांगण्याकरितांच मी आलें होतें पण आपण पंतांच्याबरोबर बोलत होतां त्यामुळं मला सांगण्यास सवड मिळाली नाहीं.

अहिल्याबाई.—मग तुला माहीत होतं तर ! काय भानगड आहे ?

हिरा.—तो पूर्वीचीच. आपण जयपुरास आलों आहोंत व चंद्रावतीचं नांव माहीत आहेच. तेथील ही सर्व कारवाई आहे.

अहिल्याबाई.—अस्सं. आतां आलं माझ्या ध्यानीं. हिरा याचा कांहींतरी बंदोबस्त ताबडतोब व्हावयास पाहिजे. इकडं कान कर. (कानांत सांगते) याप्रमाणं पुढील व्यवस्था करावयाची. जा आतां.

खंडेराव.—अहिल्या, काय कारस्थान चालविलें आहेस ? आतां पाहतों तो अप्पा मुतालकी कशी गाजवतो. सगळया त्याच्या दोस्तांना फांसून टाकलें आहे. काकांनीं इतकीं पत्रें पाठविलीं पण येतो कशाला इकडे लष्कर. फार चढून गेला होता. पहातों आतां तो ईश्वरसिंहजी—अप्पांचा दोस्त—कसा जयपुरचा महाराणा राहतो तो ! माझा दोस्त महाराणा होणार ! माधवसिंहजी, माझा प्राण, महाराणा होणार! पंत, तुम्हीं कोणाच्या बाजूचे, बोला ? ही अहिल्या अप्पांच्या बाजूची आहे. तुम्हीं माझ्या बाजूचे झालें पाहिजे.

गंगाधरपंत.—छोटे सरकार, हें काय आरंभिलें आहे तुम्हीं ? स्वस्थ जाऊन निजा पाहूं !

खंडेराव.—छे, मी निजतों कोठून ! त्या ईश्वरसिंहजीकडून आतांच्या आतां पंधरा लाख रुपये घ्यावयाचे आहेत. ते दिले नाहीं तर आतां जयपुर जाळून फस्त करावयाचें ! काकांची अशी आज्ञा आहे. अगोदर आम्हीं पंधरा लाख घेणार. अहिल्या, तूं आंत जा. पंतांशीं मला खासगी बोलावयाचें आहे. तूं आमच्या बाजूची नाहींस. अप्पाच्या बाजूची, ईश्वरसिंहजीच्या बाजूची आहेस. मला माहीत आहे. तूं आंत जा.

अहिल्याबाई.—माझी आपणाला अडचण होत असेल तर मी आपली जातें. (आंत जाते).

खंडेराव.—गेली कां तो ? ठीक झालें ! सदा भावोजी, भावोजी, म्हणून तुणतुणें वाजवीत असते. गेली एकदाची पीडा, पंत, आतां मी सांगतों. तो ईश्वरसिहजी आपल्या हुजऱ्यासह आतां इकडे येणार आहे. तुम्हांला माहीत आहे कीं, कालच त्यानें दोन लाखांचा भरणा केला आहे. पण तेवढयानें ऐकावयाचें नाहीं. पंधरा लाख आपले व चोवीस लाख माधवसिहजीचे इतके रुपये आम्हांला ताबडतोब मिळाले पाहिजेत.

गंगाधरपंत.—सरकार, हे रुपये तो एकदम कोठून आणणार ? कालचे दोन लाख महाराणीनें आपलें सर्व जडजवाहीर विकून आलेली रक्कम आपणांकडे पाठवून दिली. त्यांच्या खजिन्यांत एवढी रक्कम कोठून असणार ? कालच हरगोविंद व विद्याधर सर्व हकीकत काकुळतीनें सांगत होते. त्यांनीं विनवण्याकरून विनंति केली कीं, सर्व खंडणी आपण हफ्त्याहफ्त्यानें घ्या, पण काकासाहेब तें ऐकावयास तयार नव्हते. छोटे सरकार, मला वाटतें आपण व काकासाहेबांनीं पोटांत थोडी तरी दया ठेवावी.




श्री.खंडेराव :- यावं,राणाजी. प्रथम मुजरा करा ! होळकर राजपुत्रा पुढें जरा मान वाकवा !

**खंडेराव**.—ते आम्हीं कांहीं जाणत नाहीं. ईश्वरसिंहजी अप्पांचा दोस्त आहे. घमेंडीत राहून तो खंडणीची टाळाटाळ करीत आहे. तो अप्पांच्या येण्याची वाट पहात आहे. पण म्हणावें अप्पा येण्याच्या आंत तुझा कांटा काढतों.

**गंगाधरपंत**.—सरकार, आपण इतके निर्दय होऊं नये ! राजपूत कोणी परके नाहींत ! तेही आपले भाऊच आहेत. त्यांना आपण सांभाळून घेतलें पाहिजे.

**खंडेराव**.—राजपुतांना होळकरांचा अपमान करतां येतो ! होळकरांच्या मित्राबरोबर द्रोह करतां येतो ! होळकरांच्या शत्रूबरोबर सल्लामसलत करतां येते ! आश्चर्य आहे ! पंत, तुम्हींही त्यांच्याच बाजूनें बोलूं लागला कीं !

**गंगाधरपंत**.—सरकार, जी वाजवी गोष्ट आहे ती बोलल्यावांचून रहावत नाहीं. (शंकर येतो). कोण आहे, काय काम आहे ?

**शंकर**.—सरकार, महाराणा ईश्वरसिंहजी आपल्या भेटीस आले आहेत, आज्ञा असेल तर आंत घेऊन येतों.

**खंडेराव**.—जा, त्यांना आंत घेऊन ये. (शंकर जातो) पंत, मी बादशहासारखा असा बसणार ! तुम्हीं माझ्यासमोर हात जोडून उभे रहा. महाराणाजी आले म्हणजे त्यांनाही तसेंच बागवितों. त्यांनीं मला लवून मुजराच केला पाहिजे. मी सध्यां मुतालीक आहे. (ईश्वरसिंहजी, शंकर व गणपत येतात).

**शंकर**.—महाराणाजी आले आहेत.

**गंगाधरपंत**.—(मुजरा करून) यावें, यावें महाराणाजी. असे आसनावर बसावें.

**खंडेराव**.—(बसूनच) यावें राणाजी. प्रथम मला मुजरा करा. जरा या होळकरापुढें मान वांकवा ! सध्यां उत्तरेकडील मुतालकी माझ्याकडे आहे, हें तुम्हीं जाणतांच !

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—(नुसतां रामराम करून उभाच राहतो) राम राम भैय्याजी.

**खंडेराव**.—राम राम नाहीं ! मुजरा. तुम्हीं मला मुजरा केला पाहिजे.

**गंगाधरपंत**.—छोटे सरकार ! हं, सावध व्हा, जरा सरकून बसा. महाराणाजी, बसा असे लोडाशीं. तुम्हीं जाणतांच, सरकार जरा बेहोष आहेत !

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—तें मी जाणतों. म्हणून या वेळीं राजकारणाच्या गोष्टी होऊं शकणार नाहींत. पंत, तुम्हीं जर मजबरोबर थोडे बाहेर आलांत तर दोन गोष्टी आपण बोलून घेऊं. मग नंतर आपण होळकरसरकारांना दोन गोष्टी समजाऊन सांगा. ते आम्हीं बंधू-बंधू ! माधवसिंहजीचे बंधू ! ते आमचे बंधू ! यांत वाईट वाटण्यासारखें कांहीं नाहीं.

**गंगाधरपंत**.—बरें चला, मी येतों आपल्याबरोबर ! सरकार, आपल्या गैरहिताच्या गोष्टी मी बिलकुल करणार नाहीं. बेफिकीर असा. आम्हीं आतां येतों.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—शंकर, गणपत, तुम्हीं भैय्याशीं दोन समजुतीच्या गोष्टी करीत बसा, तोंपर्यंत पंत व आम्हीं बाहेर जाऊन येतो. (गंगाधरपंत व महाराणाजी जातात).

**शंकर**.—हं, कसें काय सरकार ? आतां काढावयाचं कां काम ? आला कां कांहीं राणाजीचा निरोप? चंद्राबाईनें (अहिल्याबाई आड येऊन उभी राहते) सांगितलें आहे कीं महाराणाजी फार

गांजलेले आहेत. आतां कांहीं झालें तर म्हणतील आत्महत्या केली म्हणून ! ही संधि फार नामी आहे बघा !'

**गणपत**.—खरेंच सरकार. एकवां ह्यांचा कांटा काढला कीं, तुमचे दोस्तच महाराणाजी बनतील. मग आम्हीं त्यांचे सरदार होऊं व तुम्हीं आमचे सरकार.

**खंडेराव**.—लेकांनों, चुप बसा. कोणी ऐकेल तर सगळेंच भांडवल फुटेल. गडद्यांनों यापेक्षां पुष्कळ पैसा काढण्याची युक्ती काढा. महाराणाजी खजीन्याला तर हात लावूं देत नाहींत. काय मस्ती आहे त्यांना. नुसता मुजरा म्हणण्याचें जिवावर आलें त्यांच्या. पण म्हणावें हा अप्पा नाहीं. त्यांना सुळावर चढवीन व आणखी वरून चाबकाचे फटकारे मारीन. ते मला काय समजतात ?

**गणपत**.—सरकार, आपण कशाला; आम्हीं त्यांची ताबडतोब चटणी उडवतों. आज्ञा आहे एवढें म्हणा. पहिले हे व दक्षिणेंतून तुमचे शत्रु शिंदेराव आले कीं, दुसरे ते. तुम्हीं लोक सरदार आम्हांला फुकट बनवाल कां? कामगिरीच जबरदस्त करून दाखवूं.

**शंकर**.—सरकार, एकदां हो म्हणा. म्हणजे झालें.

**खंडेराव**.—हें पहा. हें काम माझें नव्हें. माझें काम फक्त खंडणी मोजून घ्यावयाचें ! तें काम आमचा भैय्या माधवसिंहजीचें ! तो आजच येणार होता, पण अजून आला नाहीं. (हळुच) अरे, तो वेषांतर करून येणार आहे, बरें कां ?

**गणपत**.—सरकार, मग आपण थांबूं या ते येईपर्यंत. आपला मुख्य सरदार आल्याशिवाय कामाला रंगही चढणार नाहीं.

**शंकर**.—सरकार, असेंच करूं या. पण सरकार, हे कोण येत आहे ? अगदीं मराठेशाही पेहराव दिसतो आहे. आपल्यापैकींच कोणी असावें.

**अहिल्याबाई**.—(हळुच) ही सगळी चांडाळचौकडी इथं जमली कीं ! हा वेषांतर केलेला माधवसिंहजी दिसतो आहे. (माधवसिंहजी शिलेदारी वेषांत येतात).

**खंडेराव**.—यावें, यावें शिलेदार. आम्हीं आपलीच मार्गप्रतीक्षा करीत होतों. बरें, अगदीं वेळेवर आलांत. जरा कान इकडे करा पाहूं. (कानांत सांगतो) आतां इथें कांहीं विशेष बोलावयाचें नाहीं. तुम्हीं सर्व आपल्या ठरलेल्या मुक्कामास चला. मी तुम्हांला तिथेंच भेटेन. शंकर, गणपत, तुम्हींही जा.

**माधवसिंहजी**.—भैय्या, मला इथें यावयास किती अडचणी पडल्या हें विचारूं नकोस. यावेळीं मी उघड ओळख देणें योग्य नाहीं. शंकर, गणपत, तुम्हीं जा. मी ठरलेल्या जागीं येतोंच. (शंकर व गणपत जातात).

**खंडेराव**.—महाराणा ईश्वरसिंहजी व आमचे कारभारी गंगाधरपंत तहाच्या वाटाघाटी करीत बाहेर गेले आहेत. ते आतां परत येतील. मला वाटतें तूं लवकर गेलास तर बरें पडेल. नाहींतर तो ईश्वरसिंहजी तुला ओळखल्यावांचून राहणार नाहीं.

**माधवसिंहजी**.—बरें तर भैय्या मी जातों. मात्र लवकर ये. फार फार बोलावयाचें आहे तुझ्याशीं. (माधवसिंहजी जाऊं लागतात. इतक्यांत महाराणा ईश्वरसिंहजी येतात. दोघांची दृष्टादृष्ट होते. दोघेही एकमेकांस ओळखतात. माधवसिंहजी रागानें पाहतो. ईश्वरसिंहजी एकदम दबतो. पाठोपाठ पंत येतात. माधवसिंहजी घाईनें निघून जातात.)

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—भैय्या, हे गृहस्थ कोण? इतक्या घाईनें व रागानें कां गेले?

**खंडेराव.**—ते माझे मित्र आहेत. तुम्हीं मघाशीं जो माझा अपमान केला तो त्यांना कळला. त्यामुळें ते क्रुद्ध होऊन गेले.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—भैय्या, तुमचा अपमान करण्याचा माझा हेतु मुळींच नाहीं. तुम्हीं-आम्हीं बरोबरीचे, एका वयाचे, त्यांत मानापमान कसला बरें? तहासंबंधीं सर्व गोष्टी मी पंतांना सांगून दिल्या आहेत. त्यावर आपण विचार करा. काकासाहेबांची संमति द्या व मला एकदां ऋणमुक्त करा. बरें, आमचे शंकर, गणपत कुठें गेले. परत शहरांत गेले कां?

**खंडेराव.**—महाराणाजी, कुठले महात-न्हावी जमा करून आमच्यापुढें आणतां कोणास ठाऊक! आमच्यापुढें मुजरा करावयाला तुम्हांला लाज वाटते व आमच्याशीं तहाचें बोलणें करावयास हुजरे घेऊन येतां? शरम वाटली पाहिजे तुम्हांला. चला तुम्हीं आपले जा. तुमच्याशीं आम्हांला तह करावयाचा नाहीं. तुमची चांगलीच खोडकी मोडूं तेव्हांच आमच्या तरवारी म्यान करूं, समजलात! जा कसे निघून येथून!

**गंगाधरपंत.**—छे छे, सरकार! महाराणाजींचा अपमान! राणाजी, सरकार रागांत आहेत. तुम्हीं जा कसे. मी सर्व व्यवस्था करतों. जा, जा लवकर!

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—भैय्या, या महाराण्याचें भाग्यचक्रच फिरलें आहे. नाहींतर सर्वच माझ्यावर कां फिरले असते? भैय्या, मी लाचार आहे. तुम्हीं या वेळीं बेहोष आहांत. तुमच्याशीं मी अधिक बोलूं शकत नाहीं. पंत, तुम्हीं मात्र काकासाहेबांना जरूर जरूर माझी विनंति कळवा व मला संकटांतून सोडवा.

**खंडेराव.**—बाबा, काकासाहेबांकडे कशाला धांव घेतां! त्या अप्पांना बोलावा. ते आपली सर्व संकटें दूर करतील.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—बरें, भैय्या मी जातों. चुकी वगैरे झाली असल्यास माफी करा. येतों मी. राम राम. (महाराणा ईश्वरसिंहजी जातात.)

**खंडेराव.**—फिरून राम राम? मुजरा अजूनही नाहीं? काय ताठ मान आहे! पण माहीत कुठें आहे कीं ती मातीला मिळविली जाणार आहे! (अहिल्याबाई बाहेर येते).

**अहिल्याबाई.**—आज हें आपण मांडलं आहे तरी काय? किती टाकून बोललात तुम्हीं महाराणाजींना! जयपुरच्या महाराणाजींचा असा अपमान करणं शोभत नाहीं आपणाला! बिचाऱ्याची केविलवाणी स्थिति पाहून पाषाणालाही पाझर फुटेल. पण आपल्याला काय झालं आहे कोणास ठाऊक?

**खंडेराव.**—बस्स, झाला उपदेश सुरू? पंत, ऐकून घ्या यांचें पुराण. तोंपर्यंत मी जरा विश्रांति घेतों. (चटकन उठून आंत जातो. अहिल्याबाई व पंत आश्चर्यानें पहातात.)

**अहिल्याबाई.**—पंत, मानीव मुतालकीचा मद किती विचित्र आहे पहा! तुमचं काय म्हणणं आहे? हें सर्व योग्य चाललं आहे काय?

**गंगाधरपंत.**—सरकार, हे सर्व प्रकार पाहून दुःखच वाटतें. बिचाऱ्या शिंदेरावांना काय दोष द्यावयाचा! बाईसाहेब, आम्हीं कांहीं बोलणें म्हणजे लहान तोंडीं मोठा घास होतों. यापेक्षां अधिक काय बोलावें?

**अहिल्याबाई**.—पंत, पण तुमचं कर्तव्य आहे कीं हिताच्या गोष्टी मामंजींना सांगून या सर्व गोष्टीस आळा बसविणं.

**गंगाधरपंत**.—होय बाईसाहेब, मी माझ्याकडून जरूर खटपट करीन. मला आतां सर्व गोष्टी कळून आल्या आहेत.

**अहिल्याबाई**.—बरं तर. मी तुमच्यावर भरंवसा ठेऊन स्वस्थ बसतें. आपणही मामंजींना भेटून त्या बिचाऱ्या महाराणाजींना ऋणमुक्त करा.

**गंगाधरपंत**.—ठीक आहे, बाईसाहेब. (मुजरा करून जातो. अहिल्याबाई चिंतामग्न बसते. पडदा पडतो).

---

# अंक तिसरा.

## प्रवेश दुसरा.

(जयपुर—महाराणाजींचा महाल. महाराणा ईश्वरसिंहजी, हरगोविंद व विद्याधर बोलत बसले आहेत.)

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—हरगोविंद, विद्याधर, या बिकट प्रसंगांत काय तोड काढावी हें समजत नाहीं. होळकर सरकारनीं खंडणीचा सारखा तगादा लावला आहे. तुमच्या हातून दोन लाख रुपये भरणा केले तरी त्यांत त्यांचें समाधान झालें नाहीं. बरें आमचे कनवाळू शिंदेसरकारही दक्षिणेंत! फार पेंच पडला आहे मला. खंडेरावांनीं माझा नाहींतसा अपमान केला! सर्व दृष्टीनें जिणें अगदीं बेकार झालें आहे.

**हरगोविंद**.—महाराज, आम्हीं आपणांला अनेक मार्ग आजवर सुचविले. पण त्यांतील एकही मार्ग आपल्याला पसंत पडला नाहीं. आतां आम्हीं अधिक काय सांगावें?

**विद्याधर**.—महाराज, मी आपणांस फिरून विनंति करतों कीं आतां हें मळमळीत सौभाग्य नको आहे. त्यापेक्षां मोर्चे बांधा व मराठ्यांशीं एक-दोन हात करा. मारा किंवा लढून मरा. या खंडणीच्या ओझ्याखालीं सदैव गुदमरून मरण्यापेक्षां एकदम रणांगणांत उडी घेऊन मरून स्वर्गाला जाणें चांगलें!

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—तुम्हीं प्रधान मंडळी असून मला या संकटाच्या वेळीं मुळींच मदत करीत नाहीं. ह्यामुळें फारच निराशा होत आहे. राजे जयाजीराव असते तर माझी दया त्यांना खास आली असती. तुम्हीं म्हणतां त्याप्रमाणें मोर्चे बांधून तयारी करणें व लढाई देणें किती अवगड व धोक्याचें आहे याची कल्पना तुम्हांस नाहीं. होळकरांचें सैन्य प्रबळ असून सुभेदार मल्हारराव व खंडेराव दोघेही मजवर चिडलेले आहेत. तिकडे पेशवे खंडणीकरितां सारखे तंग करीत आहेत. दिल्लीचे बादशहा व वजीर मजवर सतत नाराज आहेत. एकंदरींत सर्व बाजूंनीं मी तंग झालों आहे. गृहसौख्याच्या बाबतींतही सर्व बाजूंनीं निराशा आहे. माधवसिंहजीचीं कारस्थानें चालूं आहेतच.

**हरगोविंद**.—सरकार, आपला स्वभाव अतिशय संशयी आहे.

**विद्याधर**.—खरंच सरकार माझेंही हेंच मत आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—तुम्हीं दोघेही या बाबतींत माझ्याशीं कांहीं एक बोलूं नका. संशय उत्पन्न होण्यास तुम्हीं दोघेही कारणीभूत आहांत. सर्व राण्यांच्या बाबतींत व चंद्रावतीच्या बाबतींत माझे संशय तुम्हीं कायम केले आहेत.

**विद्याधर.**—म्हणूनच तर महाराणाजींना सर्व प्रकारें भास होऊन राहिला आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—ठीक आहे. एकंदरींत तुमच्याकडून मला कांहीं मदत होत नाहीं तर !

**विद्याधर.**—सरकार, लढाई देऊन मरून जाणें हाच मार्ग उत्तम. यावर आपली मर्जी ! (शंकर व गणपत येतात. दोघे लवून मुजरा करतात.)

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—या मित्रानों. तुम्हीं तरी मला मदत कराल कीं नाहीं ?

**शंकर.**—सरकार, आम्हीं तर पायाचे चाकर, सांगाल ती सेवा करूं.

**गणपत.**—खरंच सरकार, सांगाल तें काम कसें बिनबोभाट करूं.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—मग असें करा. चंद्रावतीच्या घरीं खंडेरावांना बोलावून आणून त्यांची समजूत करावी व खंडणीकरितां वर्ष दोन वर्षें थांबण्यास सांगावें. सुभेदारांचे ते लाडके असल्यानें ते एवढें खास ऐकतील.

**गणपत.**—सरकार म्हणत असतील तर आम्हीं आतांच व्यवस्था करतों. खंडेराव म्हणजे चंद्रावतीबाईंच्या अगदीं मुठींत आहेत.

**शंकर.**—सरकार, खंडेराव सरकार आमच्याही बाहेर जाणार नाहींत. पण पहा इनाम फार फार मोठें पाहिजे बरें कां ?

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—अरे काम झाल्यावर इनामाला काय तोटा आहे ? मागाल तें इनाम देईन तुम्हांला !

**गणपत.**—शंकर, चल कीं मग आतांच कामाला लागूं या. सरकार, आम्हांला परवानगी द्या.

**शंकर.**—खरंच सरकार, आम्हीं आतांच जातों. इनाम मात्र मोठें दिलें पाहिजे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—(आनंदानें) दोस्तांनों, जा तुम्हीं; लवकर यशस्वी होऊन या. तुमच्या मनाजोगतीं बक्षिसें मी तुम्हांला देईन. (शंकर व गणपत दोघेही मुजरा करून जातात.) विद्याधर, हरगोविंद, या घांच्या खटपटीस यश आलें नाहीं तर मग आपण लढाईचा विचार करूं. बरें, खंडणी आणखी देण्याचा प्रसंग आला तर काय करावें ? खजीना तर सर्व रिता पडला आहे.

**विद्याधर.**—सरकार, सर्व महाराणींचे जडजवाहीर, दागदागिनें, सोनें, नाणें सर्व बाहेर काढावें. आपली इच्छा असेल तर आमच्या महाराणींना मी विनंति करीन.

**हरगोविंद.**—विद्याधर, अशा कामीं आमच्या महाराणीही मागें सरणार नाहींत ! महाराणाजी सांगतील तर मीही त्यांना विनंति करीन. आतां राहिल्या मोठ्या महाराणी ! पण त्या राजे शिंदेरावांची माळ जपत आहेत. रात्रंदिवस त्यांची मार्गप्रतीक्षा चालली असून त्यांच्याकरितां त्यांचे उपासतापासही चालूं आहेत.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—(सुस्कारे टाकून) काय माझी केविलवाणी स्थिति ! सर्व राण्यांचा लोभ पर-पुरुषांवर ? चंद्रावतीचा ओढा भैय्या माधवसिंहजी व खंडेराव या कडे ! राज्याची स्थिती सर्व बाजूनीं बेकार ! खजीन्यांत एक पैही नाहीं ! मराठ्यांनीं व विशेषतः होळकरांनीं भयंकर जुलूम चालविलेला आहे ! आतां माझ्या जीवितांत कोणतें रहस्य राहिलें आहे ? हरगोविंद, विद्याधर, जा तुम्हीं आतां. मला थोडें निवांत बसूं द्या !

**हरगोविंद**.—सरकार आपण फार विचार करूं नका. आपलें डोकें खराब होऊन जाईल. आपण म्हणाल तर आमचें सर्वस्वही आम्हीं आपणांस अर्पण करूं !

**विद्याधर**.—खरंच महाराणाजी, आपण आज्ञा करावयाचा अवकाश कीं राज्यांतील सर्व सावकार ओरबाडून काढूं व लागेल ती रक्कम उभी करूं. हरगोविंद, सरकारांना करूं द्या विचार! आपण पुढील उद्योगास लागूं या.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—सध्यां माझें मन फार अस्वस्थ आहे. तुम्हीं जा !

**हरगोविंद**.—ठीक आहे सरकार. चला विद्याधर.

**विद्याधर**.—चला. येतों सरकार. (दोघेही मुजरा करून जातात.)

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—ही मनाची अस्वस्थता कशी कमी होईल कांहीं कळत नाहीं. देवा, काय मला दुबळें बनविलें आहेस ? प्रपंचाची तऱ्हा ही अशी ! राज्याची तऱ्हा ती तशी ! माधवसिंहजी वेषांतर करून खंडेरावाशीं उघड उघड खलबत करीत आहे. चैन तरी कसें पडावें ? त्या गंगाधरपंतांनीं व खंडेरावांनीं अगदीं सतावून सोडलें आहे. राजे जयाजीराव, माझें निर्वाणीचें मित्र, अद्याप इकडे येत नाहींत. मी स्वतः सांडणीस्वार पाठविले. महाराणीनें अनेक विनवणीचीं पत्रें व सांडणीस्वाराबरोबर खास विश्वासाच्या दासीही पाठविल्या. उत्तरें आलीं कीं, श्रीमंत पेशवे अद्याप मला सोडीत नाहींत. मी शिंदेरावांच्यावर अवलंबून आहे, हें कळल्यापासून होळकर अधिकच रुष्ट आहेत. तिकडे माधवसिंहजींचीं कारस्थानें तर भरमसाट चालूं आहेत. काय करावं ? कांहीं समजत नाहीं ! हं, गणपत व शंकर चंद्रावतीकडून खंडेरावाकडे जाणार होते. ते कशी कामगिरी पार पाडतात हें चंद्रावतीकडे जाऊन पहावें. (जातात).

---

# अंक तिसरा.

## प्रवेश तिसरा.

(माधवसिंहजी मराठ्यांच्या वेषांत, चंद्रावतीच्या वाड्यांत आले असून चंद्रावती, माधवसिंहजी, गणपत व शंकर बोलत बसले आहेत.)

**चंद्रावती**.—मग सरकार कसं काय ? मागं शिंदेरावांच्या बाबतींत आपला बेत फसला. पण आतां महाराणाजींच्या बाबतींत आपण खास यशस्वी ठरूं. मूळ कांटाच काढून टाकला कीं आटोपलं.

**माधवसिंह**.—त्याच हेतूनें तर मी वेष पालटून तांतडीनें इकडे आलों आहे. दादांची ब्याद एकदां जगांतून नाहींशी केलीच पाहिजे. शंकर, गणपत, तुम्हीं दादांकडून आला. काय म्हणत होते ते ?

**शंकर**.—राणाजी, ते म्हणत होते कीं, चंद्रावतीबाईंना मध्यस्थ करून आपण खंडणीबद्दल तडजोड करावी. त्यांत मला व गणपतला मोठें इनाम मिळणार आहे. आतां आपण जी आज्ञा कराल ती आम्हांला मान्य !

**माधवसिंह**.—मग असेंच ठरवूं कीं, चंद्रा व तुम्हीं मिळून संधि मिळतांच दादांची ब्याद दूर करावयाची.

**चंद्रावती**.—आम्हांला आज्ञा मान्य आहे. आपण पहिलं हें ठरवा कीं राण्यांच्या बाबतींतही कांहीं करावयाचं कीं काय ? माझ्या जन्माच्या वैरिणी त्या ! एकदां त्यांचंही कंदन करावं असं वाटतं.

**माधवसिंह**.—त्यांच्यांत कोणी गरोदर आहेत कां? एखादा वारस उत्पन्न होण्याचा संभव आहे कां? नसला तर मला त्यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं.

**चंद्रावती**.—राणाजी, ते आपल्या दृष्टीनं योग्य झालं. पण आजपर्यंत त्यांनीं माझ्याशीं जो सवतिमत्सर केला, माझा सारखा पाणउतारा-अपमान त्या करीत राहिल्या, त्याचा बदला घेतल्या-वांचून माझ्या जिवाचं तरी समाधान होणार नाहीं. मग तुम्हीं कांहीं करा. एकदां सर्व सत्यानाश झाला म्हणजे माझं मन शांत होईल.

**माधवसिंह**.—(स्वगत) काय भयंकर सुडाची भावना आहे ही! (उघड) चंद्रा, तुझें तूं आपलें पाहून घे. माझें काम दादाशीं! शंकर, गणपत मग केव्हांचा बेत बोला? जमलें तर एक दोन दिवसांतच चांगलें जमेल.

**शंकर**.—घुटी पाजून त्या गुंगीतच सोमलखार चंद्राबाईंनीं पाजावा म्हणजे झालें. महा-राणाजींना इथें आणण्याचे काम आमचें.

**चंद्रावती**.—महाराणाजी, इथें सांपडतील पण राण्या इथं कशा याव्यात? त्यांच्या रक्ताची प्यास माझी कशी बुजावी?

**माधवसिंह**.—अरे त्यांत काय अवघड? सर्व तयारी ठेवावी. सोमरस म्हणून सर्वांस पाजावा म्हणजे झालें. एकदम सर्वांचे बळी घेतले कीं काम आटोपलें. अरे पण हे कोण येत आहे? दादाच वाटतें. चंद्रा, देवानें चांगली संधि चालून आणली आहे. बरें, मी इथें असणें योग्य नाहीं. आतां असें करा कीं शंकर व चंद्रा यांनीं सोमरसाची किंवा थंडाईची खास व्यवस्था करावी. त्यांतच सोमल मिसळावें. गणपतनें सर्व राण्यांना महाराण्याची तब्येत बिघडली म्हणून सांगून सर्वांना इथें गोळा करावें व चंद्रानें सर्वांनाच सोमरस किंवा थंडाई पाजण्याची व्यवस्था करावी. म्हणजे पहाटेपर्यंत सर्व निकाल लागला पाहिजे. बरें मी जातों. नाहींतर सर्व मामला बिघडून जाईल. उद्यां सकाळीं येऊन पाहीन तेव्हां सर्व निकाल लागलेला मला दिसला पाहिजे. (घाईनें निघून जातो. ईश्वरसिंहजी येतात. ते माधवसिंहजीस पाहून ओळखतात व बिचकून उभे राहतात.)

**चंद्रावती**.—यावं, यावं महाराणाजी. आज स्वारी इकडं कुणीकडं झुकली. आज जेवण वगैरे इथंच करावयाचं. व रात्रौ इथंच आराम करावयाचा. आज एक दिवस तरी आमचं भाग्य उघडूं द्या.

**शंकर**.—खरेंच सरकार. असेंच करा. आज आपण इथेंच विश्रांति घ्या.

**महाराणा ईश्वरसिंहजी**.—गड्यांनों, तुम्हीं आमच्या कामाचें काय केलें? मोकळ्या मनानें तुम्हीं सर्वजण सांगा. चंद्रा, हा माधवसिंहजी तुझ्याकडे सारखा येतो ह्याचा मतलब काय? मी आतां त्यास जातांना पाहिलें. तुम्हीं माझी माणसें असून शत्रूशीं सल्ला मसलत करतां असा मला दाट संशय येऊं लागला आहे. काय असेल तें खरें सांगा.

**चंद्रावती**.—(स्वगत) आजच तुमची अखेर करणार आहोंत. (उघड) सरकार, आपण नेहमीं आमच्याबद्दल असाच संशय घेता! माणसाच्या प्रेमाची कधींच खातरजमा होत नाहीं. आपल्याच कामाकरितां खंडेराव सरकारांच्याकडील एक त्यांचा आवडता हेर इथं येऊन गेला. शंकर-गणपत यांनीं त्यास माझ्याकडे आणलें होतें. सरकार, आपलं काम होईल अशी आम्हांला उमेद नाहीं. आपणांस धाकट्या राणाजींचाच संशय आला. काय म्हणावं महाराणाजींना? गणपत-शंकर, पहा बरं खऱ्या राजसेवेचं हें फळ होय, समजलांत!

**शंकर.**—महाराणाजी, आम्हीं इतकी जिवापाड मेहनत करीत आहों कीं कसेंही करून आपलें काम झालें पाहिजे. आपण सेवकांसंबंधीं संशय ठेऊं लागला तर मोठीच पंचाईत होणार आहे.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—मला माझ्या डोळ्यांनींच फसवलें म्हणावयाचें. हो! चर्मचक्षूच ते! सेवकासारखे हे चर्मचक्षु प्रामाणिक कोठून असणार? बरें तें असो. माझ्या कामाचें कुं वर आलें आहे?

**गणपत.**—सरकार, आपल्या कामाचा उद्यां सकाळपर्यंत पुरता निकाल लागलाच पाहिजे, अशी आम्हीं सर्व व्यवस्था करून राहिलों आहोंत. चंद्रावतीबाईचें प्रेम किती अगाध! त्यांत बुड्या मारून मारून गटंगळ्या खात खातच स्वर्गसुखाचा आपणांस अनुभव येईल! खरें म्हटलें तर सरकार, चंद्रावतीबाई म्हणजे रंभा किंवा मेनकाच म्हटल्या पाहिजेत. काय सौंदर्य, काय कोमलकंठ, किती प्रेमळ वागणूक! त्या समोर दिसल्या कीं कोणाचीही अगदीं तहानभूक हरून जाते, सरकार.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—तुम्हीं सर्व मंडळी माझ्या भरंवशाची! म्हणूनच राजकारणांतील अगदीं नाजुक काम आपल्यावर सोंपविलें आहे. चंद्रा, मी तर जिवाला अगदीं कंटाळलों आहे. खंडणीचें काम भागलें तर ठीक नाहींतर आपण तरी आत्मघात केल्यावांचून रहाणार नाहीं.

**चंद्रावती.**—(स्वगत) ती सर्व व्यवस्था आम्हींच करीत आहोंत. आपण नको तसदी घ्यावयास. (उघड) सरकार, हें काय भलतंच बायकांसारखे विचार. कुणी ऐकेल तर हंसेल कीं. महाराणाजींनीं असले विचार बिलकुल सोडून द्यावे. आपण आजची रात्र अगदीं खुशींत काढावी. आपण आपल्या सहवासानं माझ्या जिवाला समाधान प्राप्त करून द्यावं. राया, आजची ही इष्काची रात्र तुम्हीं माझ्या सहवासांत घालवावी. आपलं उदासीन मन उद्यां खास प्रफुल्लित होईल. तसं झालं नाहीं तर कलावंतिणीची कला ती काय?

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—बरें तर आम्हीं आज इथेंच आराम करूं. आंतील दिवाणखान्यांत आम्हीं विश्रांति घेतों. आज सर्व सुखांचीं साधनें एकत्र करून चंद्रा, माझें औदासीन्य तूं दूर कर! आंत सर्व तयारी आहे ना?

**चंद्रावती.**—हं हं सरकार, सर्व तयारी आहे. शंकर, महाराणाजींना आरामाचा दिवाणखाना दाखव. मी तुमच्या पाठोपाठ आलेंच.

**शंकर.**—चलावं सरकार, आपण आतां निवांत विश्रांति घ्यावी.

**महाराणा ईश्वरसिंहजी.**—चल शंकर, हा मी येतों. (दोघे आंत निघून जातात).

**गणपत.**—बाईसाहेब, कांहीं करा पण आजचें काम बिघडतां उपयोगी नाहीं. ही संधि गेली कीं सर्व फिसकटेल. दक्षिणेंतून ते शिंदेसरकार आले कीं महाराणाजींची बाजू सरस झालीच. मग मात्र या माधवसिंहजी राणाजींचें कांहीं चालावयाचें नाहीं.

**चंद्रावती.**—गणपत, तूं म्हणतोस तें अगदीं खरं आहे. त्या मोठ्या महाराणीनं तर त्यांचा सारखा धांवा चालविला आहे. उपासतापास, देवधर्म सारखा चालू ठेवून पत्रांवर पत्रं व दासी पाठीमागून दासी पाठविण्याचा सपाटा सुरू ठेविला आहे. पण ते कृष्ण भगवान् अर्जुन या द्रौपदीकरितां कांहीं धांव घालीत नाहींत. कसल्या कामांत गुंतले आहेत कोण जाणं!

**गणपत.**—बाईसाहेब, तुम्हांला माहीत नाहीं वाटतें. अहो, मुतालकीबद्दल शिंदे-होळकरांत तेढ माजून आज भयंकर परिणाम होण्याची वेळ आली आहे. शिवाय त्या पेशव्यांना तिकडे जबरदस्त शत्रु निर्माण झाल्यामुळें ते या शिंदेरावांना कडे येऊं देत नाहींत. ते इकडे आले तर त्यांची बाजू

कोणी सांवरावी ? त्यांची इकडे येण्याची इच्छा असूनही पेशव्यांच्या अडचणीकरितां त्यांना इकडे येतां येत नाहीं. त्यांना इकडे आड व तिकडे विहीर झाली आहे.

**चंद्रावती.**—बाकी ही गोष्ट खरी कीं ते इकडं येतांच आपली बाजू लंगडी पडेल. यासाठीं आजच आपण घाई करून सर्वांना नेस्तनाबूत केलं पाहिजे. गणपत, सर्व महाराण्यांना मात्र राणाजींची तब्येत बिघडली म्हणून ताबडतोब गोळा करून आण. साधारण मध्यरात्रीं त्या याव्यात म्हणजे उजाडेपर्यंत सर्व निकाल लावण्यास ठीक पडेल. सोमलखार आहेच तो सोमरसांत किंवा थंडाईंत मिसळून देऊं. सर्वांना पाजूं म्हणजे झालं.

**गणपत.**—ठीक आहे बाईसाहेब. मी सर्वांना गोळा करून आणतों पण धाकटे राणाजी पेटारा घेऊन इकडे येत आहेत. ही कसली आणखी भानगड ? (माधवसिंहजी पेटारा घेऊन येतो).

**चंद्रावती.**—(घाबरून) ही काय आणखी पीडा आणिलीत ? सापाचा पेटारा दिसतो आहे ?

**माधवसिंह.**—(हंसून) चंद्रा, दैव अनुकूल असलें म्हणजे असें असतें. मी जात असतां नुकतांच एक गारुडी काळा नाग पकडीत होता. त्याला दिलें पोटाला आणि इकडें आणलें काळ्या नागाला ! चंद्रा, फार कडक जहर असतें ह्याचें ! सोमरस, सोमलखार, व हा काळा नाग, तिन्हीं शस्त्रें दादावर चालवावयाची आहेत. (हंसत) हां-हां-हां ! काय मौज होईल. शत्रु त्यांतून कसा निसटेल तें पाहूं. चंद्रा, गणपत, सांभाळा ह्याला. सर्व येथें जमले कीं सोमलखार सोमरसांत पाजावयाचा व नंतर हा काळा नाग त्यांच्यांत मोकळा सोडावयाचा. मग सर्वांचें काम बिनबोभाट झालंच समजा. बरें विषघाताचा आरोप मग रहातच नाहीं. सर्पदंशानें सर्वनाश झाला असें छाती पिटून सांगावयास हरकत नाहीं.

**चंद्रावती.**—छे बाई, मला फार फार भीति वाटते. गणपत, तूंच घे व त्याला सांभाळून ठेव. साप म्हटलं कीं माझ्या अंगावर अगदीं कांटा येतो. गणपत, हा काळा नाग बरोबर सोडण्याची कामगिरी तुझीच बरं ! हूं, पेटारा नको उघडूं बाबा. एखादे वेळेस चवताळून मजवरच उडी घ्यावयाचा ! राणाजी, याला दूर ठेवा. माझ्या जिवाला बाई कांपरं सुटलं आहे !

**माधवसिंह.**—वेडी कुठची. त्यांत भिण्यासारखं काय आहे ? कोणाकडून तरी आपणांस शत्रूंचा नाश करावयाचा आहे. असें भिऊन कसें चालेल ? काळीज घट्ट करावयास पाहिजे. आजची रात्र म्हणजे कत्तलची रात्र ! उद्यां सकाळपर्यंत सर्वांचे ताजिये थंड झालेच पाहिजेत !

**चंद्रावती.**—हा काळा नाग पाहिल्यापासून माझं मन घाबरं होत आहे ! वाटलं जणूं हा प्रथम मजवरच झडप घालणार आहे ! राणाजी, या यमाला येथून घेऊन जा. मी सर्व व्यवस्था करतें ! पण हा कराल इथं मजजवळ नको बाई ! गणपत ! घे, घे तो आणि दूर कोठेंतरी नेऊन ठेव. (गणपत माधवसिंहजीजवळून पेटारा घेतो.)

**गणपत.**—बाईसाहेब, असें घाबरण्यासारखें यांत काय आहे ? हा आपणांस मदतच करील कीं ? वेळेवर सोडण्याचें काम मी करतों पहा ! (पेटाऱ्यासह आंत जातो.)

**माधवसिंह.**—चंद्रा, काय भित्री आहेस तूं ? बाकी स्त्रीहृदय असेंच हलकें असतें म्हणतात! पण तुला सूड घ्यावयाचा आहे ना ? सूड घ्यावयास तुझ्यासारख्या जातिवंत, स्वाभिमानी, नागिणीला हा काळा नाग हें एक उत्तम साधन नाहीं का ? (हंसत) हां-हां-हां ! ! उद्यां सकाळीं जगाला काय दृश्य दिसणार आहे ? हा माधवसिंहजी उद्यां सर्व वैऱ्यांचे बळी घेणार ! चंद्रा, मी येतों. आतां उद्यां सकाळीं भेट. (माधवसिंहजी निघून जातात.)

**चंद्रावती**.—किती भेसूर हंसणं हें ! इतकी निष्ठुर मी, पण काळ्या नागाला पाहिल्या-पासून मला भलतंच भविष्य दिसूं लागलं आहे. काय होतं कोणास ठाऊक. असं वाटतं कीं या जंजाळांतून दूर कुठंतरी पळून जावं ! या सर्व गोष्टी माझ्या हातून नाहीं होणार ! देवा, मी फसल्या-सारखी झालें आहे ! गांगरून गेले आहे. शंकर, गणपत व राणाजी दृढ निश्चयानें आहेत ! ते मला यांतून बाहेर जाऊं देणार नाहींत. फसलें आहे खरी. पण आतां सावध होऊन व पश्चात्ताप करून उपयोग काय ? जें जें होईल तें पाहिलं पाहिजे ! मात्र एकंदर परिस्थिति कांहीं ठीक दिसत नाहीं ! चला आंत महाराणाजी वाट पहात असतील. (आंत जाते. पडदा पडतो.)

---

# अंक तिसरा.

## प्रवेश चवथा.

(सकाळची वेळ, चंद्रावतीच्या वाड्यांतील एक दिवाणखाना—महाराणीचें शिर मांडीवर घेऊन अहिल्याबाई औषधोपचार करीत आहेत. राजे जयाजीराव शेजारी बसून अहिल्याबाईंना मदत करीत आहेत. जवळ कला व हिरा या दासी उभ्या आहेत.)

**अहिल्याबाई**.—भावोजी, महाराणी सावध होत आहेत कां ? काय भयंकर विष हें ! अगदीं काळ्या ठिक्कर पडत चालल्या आहेत ह्या !

**राजे जयाजीराव**.—वहिनी, ह्यांची तब्येत मला कांहीं ठीक दिसत नाहीं. अहो, सोमल-खार पहिलेंच भयंकर विष ! त्यांत पुनः काळ्या नागाचें विष ! जगण्याचा संभव कमीच दिसतो. वहिनी, राज्यतृष्णेचा व अधिकारलालसेचा किती भयंकर परिणाम झाला हा ! महाराणाजी, तिघी राण्या व चंद्रा कलावंतीण ह्या सर्वांचा नाश माधवसिंहजींच्या राज्यतृष्णेनें केला.

**अहिल्याबाई**.—भावोजी, एवढंच नव्हें तर आमचे मामंजी व पतिराज ह्यांच्या मुताल-कीच्या अधिकारलालसेचाही हा परिणाम आहे. घरचीं माणसं झालों म्हणून काय झालं ! मी प्रथम-पासूनच या माधवसिंहाबद्दल शंकित होतें. अखेर तोच परिणाम घडून आला. अगबाई ! महाराणी थोड्या हालचाल करूं लागल्या ! डोळे मात्र उघडत नाहींत. तोंडातल्या तोंडांत कांहीं पुटपुटत आहेत. देवा, पलीकडच्या दिवाणखान्यांत सर्वांचीं प्रेतें पडलीं आहेत. निदान ह्या बिचारीला तरी वांचव.

**राजे जयाजीराव**.—(महाराणींच्या तोंडास पाणी लावून) वहिनी ! वहिनी ! हा तुमचा भावोजी हांकेला ओ देत तुमच्या मदतीकरितां धांवून आला आहे. सावध व्हा, डोळे उघडा, एकदां या आपल्या भावोजीशीं दोन शब्द बोला !

**महाराणी**.—(डोळे उघडून राजांच्याकडे पहात, हळू स्वरांत) कोण, भावोजी कां ? देवा, किती वेळ केलात यावयास ? महाराणाजी कुठं आहेत ? इतर राण्या कुठं आहेत ? भावोजी, शत्रूंनीं डाव साधला ! सोमलखार सोमरसांत पाजून व आमच्या सर्वांच्या अंगावर काळा नाग सोडून आमचा नाश केला कीं हो ! महाराणाजींना वांचवावं म्हणून मी त्या काळ्या सर्पाला आडवी गेलें व त्यानें मला कडकडून चावा घेतला. अग आई ! पाणी, महाराणाजी कुठं आहेत ?

**राजे जयाजीराव**.—(पाणी पाजीत) वहिनी, तुम्हीं सावध व्हा. बाकी सर्व मंडळी त्या पली-कडील दिवाणखान्यांत आहेत. (डोळे पुशीत) वहिनी, तुमच्या मदतीला मी वेळेवर आलों नाहीं त्यामुळें हा सर्वनाश घडला. एरवीं असा घात झाला नसता !



माधवसिंहजी :-(हंसत) हां। हां। हां। उद्यां सकाळी जगाला-
काय दृश्य दिसणार आहे? हा माधवसिंहजी सर्व वैऱ्यांचे
बळी घेणार।---



श्री. राजेजयाजीराव :- वहिनी ? छे, छे असा शाप देऊं नका ह्या माझ्या दुसऱ्या जिवाभावाच्या वहिनी तुम्हां जवळ बसल्या आहेत. ह्यांच्या जिवाला फार दुःख होईल।

**महाराणी.**—(हळू स्वरांत) भावोजी, काय सांगूं तुम्हांला. त्या सुभेदार होळकरांनीं व आमच्या वीरांनीं असा घात केला ! आमचा सर्वनाश केला. देव त्यांनासुद्धां असंच धाय मोकलावयास लावील.

**राजे जयाजीराव.**—वहिनी ! छे, छे, असा शाप देऊं नका. ह्या माझ्या दुसऱ्या जिवा-भावाच्या वहिनी तुम्हांजवळ बसल्या आहेत. ह्यांच्या जिवाला फार दुःख होईल. सर्वकांहीं आपल्या भाग्यानें होतें. दुसऱ्याला दोष देऊन काय उपयोग ?

**अहिल्याबाई.**—भावोजी, प्रत्येक सतीच्या तोंडून हेच शब्द निघतील ! दुष्ट ते दुष्ट ! मुष्ठ ते मुष्ठ ! यांत वाईट काय वाटावयाचं आहे ? केलेल्या कर्मांचीं फळंहीं त्यांना भोगावीं लागणारच आहेत.

**महाराणी.**—(हळू स्वरांत) देवी, माफ करा मला. माझ्या तोंडून वाईट शब्द निघाले. देवा, तूं देवीचं नेहमीं भलं कर. पुरुषांनीं केलेलीं पापं सतींवर घसरत नाहींत.

**अहिल्याबाई.**—असं म्हणूं नका. स्त्री ही पुरुषाची अर्धांगी आहे. म्हणून पुरुषानें केलेल्या बऱ्यावाईट कृत्यांचा परिणाम त्यांच्या स्त्रियांनाही भोगावयास लागणारच.

**महाराणी.**—(हळू स्वरांत) देवी, आमचं आतां काय उरलं आहे ? जें आमच्या नशीबीं व्हावयाचं तें होऊन चुकलं आहे. अग आई, पाणी. (राजे पाणी पाजतात) भावोजी, महाराणाजींचं काय झालं ? मला वाटतं ते स्वर्गाची वाट चालून गेले. ते पहा, ते पहा; ते मला बोलावीत आहेत. मी आतां जातें. भावोजी, देवी, येते बरं आतां.

**कला.**—(गळां पडून) बाईसाहेब, हें काय ? असं बोलूं नका. शिंदेसरकारांना फार दुःख होत आहे. तुम्हींच असं बोलूं लागल्यावर त्यांना धीर कसा यावा !

**महाराणी.**—(हळू) कला, मी आतां वांचूं शकत नाहीं. भावोजी माझ्या खऱ्या जिवा-भावाचे ! त्यांनीं आमच्याकरितां अनेक वेळां संकटांत उडी घेतली व आतांही ते धांवून आले. पण दुर्भाग्य आमचं. सर्वच घडी बिघडली. ऊठ, शोक करूं नको. यापुढं तूं भावोजींच्याबरोबर राहून त्यांची सेवा कर. विषांचा भयंकर परिणाम माझ्यावर झाला आहे. भावोजी, मी आतां जगूं शकत नाहीं. अग आई ! पाणी. (राजे पाणी पाजूं लागतात. इतक्यांत माधवसिंहजी व खंडेराव घुटी पिऊन बेहोष स्थितींत प्रवेश करतात. माधवसिंहजी राजांच्या हातांतील पेला हिसकावून फेंकून देतो.)

**माधवसिंह.**—शिंदेराव, प्यार करा प्यार ! महाराणीला प्यार करा ! अहो बहाद्दर, इतरांप्रमाणें तिलाही मरूं द्या कीं ! (महाराणीला हिसडा देऊन खालीं ओढतो. अगबाई करून ती प्राण सोडते.)

**राजे जयाजीराव.**—अरेरे चांडाळा, हें काय केलेंस ? ती बिचारी साध्वी, तिला सुखासमाधा-नानें मरूंसुद्धां दिलें नाहींस कीं ! नीचा, तूं माणूस आहेस कीं राक्षस आहेस ?

**माधवसिंह.**—हं ! हं ! हं ! शिंदेराव रागावूं नका हं ! मी घुटी प्यालों असल्यानें हा अत्याचार मजकडून झाला. मला माफ करा. पहा बरं आमच्या दादांनीं केवढा घात करून घेतला. खंडणीसाठीं कुणी प्राणत्याग करतो कां ? व तोही सर्व राण्या व कलावंतिणीसह ? तुम्हींच विचार करा. मी नसती कां खंडणी भरली ? एवढं सर्वांनीं प्राणत्याग करून घेण्याचें काय कारण होतें ?

**खंडेराव.**—कां अहिल्या, तूं इथें कशी ? हो अप्पा आले ना ? शिवाय तूं पडलीस सात्त्विक ! मग यावयाचीच महाराणीच्या मदतीला ! (तिला हिसडा देऊन उठवितो.) चल ऊठ, हो चालती छावणींत; आली आहे इथें मरायला. हिरा, घेऊन जा तिला निकडे.

**हिरा.**—चला बाईसाहेब, सरकार घुटी प्यालेले आहेत. उगीच सर्वांच्या देखत तुमचा अपमान करतील.

**अहिल्याबाई.**—चल बाई. दुष्ट त्याला तरी कांहीं मर्यादा असते. इथं कांहीं न बोलावं हेंच ठीक! भावोजी, जातें मी! महाराणाजींच्या सर्व माणसांच्या दहनक्रियेची व्यवस्था करा. मी जातें. (दासीसह घाईनें निघून जाते.)

**माधवसिंह.**—शिंदेराव, मी वारस आहे. मी सर्व व्यवस्था करीन. तुम्हीं बिनधोक आपल्या छावणींत जा. हीं माझीं माणसें आहेत. त्यांची मी पूजा करीन नाहींतर त्यांना गिधाडांपुढें टाकीन. खंडेराव, खरें कीं नाहीं?

**खंडेराव.**—खरें आहे भैय्या. अप्पा, सर्व व्यवस्था भैय्याला करूं द्या. आतां महाराणाजी आमचे भैय्या माधवसिंहजी आहेत.

**राजे जयाजीराव.**—माधवसिंहजी, खंडेराव, तुम्हीं येथून चालते व्हा! माझ्या मित्राच्या व त्याच्या राण्यांच्या शवांची व्यवस्था मला करूं द्या! तुम्हीं जास्त गडबड कराल तर मला नरसिंहावतार धारण करावा लागेल. अरे, कांहींतरी माणुसकी ठेवा. सर्व कृत्यांचे तुम्हीं खलनायक असून आत्म-हत्येचा आरोप तुम्हीं करीत आहांत, बस्स करा! तुमची कृति कृतांत काळासही लाजेनें खालीं मान घालावयास लावील. तुम्हीं येथून चालते व्हा. मी त्यांची सर्व व्यवस्था करतों.

**माधवसिंह.**—शिंदेराव, तुम्हीं आमचा अपमान करणारच! कारण आजवरची ती प्रथाच आहे. बरें, झाल्या गेल्या गोष्टी विसरून जा. तुम्हीं आम्हांला महाराणा बनवा. पासष्ट लाख खंडणी घ्या. ह्या प्रेतांची व्यवस्था खुशाल तुम्हीं लावा. आमची कांहीं हरकत नाहीं.

**राजे जयाजीराव.**—या वेळीं तुम्हीं जा. पुढें विचार करतां येईल. खंडेरावभैय्या, तुम्हीं छावणींत निघून जा. नाहींतर कांहीं तरी दगा होईल!

**खंडेराव.**—अप्पा, अजूनही माझा अपमान करीत आहांत. तुम्हीं सांगतां तर जातों आम्हीं. पण मुतालकीच्या युवराजाचा हा उघड उघड अपमान आहे. आतां तुम्हीं मुतालीक नाहीं. काका आहेत समजलांत! अहो नुकतेंच पेशव्यांचें पत्र आलें आहे कीं मुतालीक काकासाहेबांना केलें आहे.

**राजे जयाजीराव.**—आग लावा त्या मुतालकीला. त्या मुतालकीनेंच आज एका रात्रींत पांच माणसांचे बळी घेतले. तुम्हीं येथून जा. उगीच मला चिडवूं नका!

**माधवसिंह.**—खंडेराव, चला बाबा, आज ना उद्यां शिंदेराव आमच्या बाजूला वळतीलच! चला, आपण काकांच्याकडे जाऊन ही सर्व हकीकत कळवूं.

**खंडेराव.**—चला भैय्या. (दोघेही जातात.)

**राजे जयाजीराव.**—(महाराणींचें मस्तक मांडीवर घेत) अरेरे! काय मनुष्यस्वभाव हा! माणसांनींच माणसांची काय अवस्था केली आहे! कसली निष्ठुर ही अधिकारतृष्णा? कला, माझ्या माणसांना बोलावून सर्व प्रेतांची व्यवस्था लावली पाहिजे. माझें हृदय दुःखानें तर्के भरून आलें आहे कीं या वेळीं मला कांहींच बोलवत नाहीं.

**कला.**—सरकार, थोर ते थोर! आपल्यासारखीं माणसं जगांत विरळा. आपण आजवर ह्या दुर्दैवी जीवांकरितां काय केलं नाहीं? पण ईश्वराचा योगायोगच असा. त्यापुढं कुणी जावं! सरकार, आपण थोडी विश्रांति घ्या. मी माणसांना बोलावून प्रेतयात्रेची व्यवस्था करतें. लांबड्या दौडीनें आपण थकून गेले आहांत. थोडा वेळ तयारी होईपर्यंत विश्रांति घ्या.




श्री. राजेजयाजीराव :- अरेरे ! काय मनुष्य स्वभाव हा ! माणसांनीच माणसांची काय अवस्था केली आहे ! कसली निष्ठुर ही अधिकार तृष्णा ?

**राजे जयाजीराव.**—(महाराणी मस्तक खालीं ठेवून) कला, आम्हीं शिपाईगडी. आम्हांला कसली विश्रांति. आतां सर्व प्रेतांची व्यवस्था झाल्यानंतरच विश्रांति. कला जा तयारीस लाग.

**कला.**—जी सरकार. कला ( जाते. पडदा पडतो).

---

# अंक तिसरा.

## प्रवेश पांचवा.

(राजे जयाजीराव, रामचंद्रबाबा व गंगाधरपंत बोलत बसले आहेत.)

**गंगाधरपंत.**—राजे, सुभेदारांनीं आपणाकडे मला पाठविलें आहे. महाराणा ईश्वरसिंहाचा शेवट असा दुःखकारक झाला, ह्याबद्दल सर्वांनाच खेद होत आहे. झाल्या गोष्टीस इलाज नाहीं. खंडेराव व माधवसिंहजी हीं दोन्हीं मुलेंच आहेत. म्हणून त्यांना आतां क्षमा करावी. माधवसिंहजी सर्व गुन्ह्यांबद्दल भरपाई करण्यास तयार आहे.

**राजे जयाजीराव.**—पंत, मला आतां या राजकाजांचा वीट आला आहे. ती मुतालकी नको त्या होळकरांच्या भानगडी नकोत, नी कांहीं नको! तुम्हीं काय वाटेल तें करा. मी माझें अंग काढून घेऊन आपला उज्जैनकडे सैन्यासह जातों. असल्या घाणेरड्या व धोक्याच्या वातावरणांत राहणें मला तरी योग्य दिसत नाहीं. बाबा, तुमचें काय मत आहे? काकासाहेबांनींच या प्रकरणाची कड लावावी असें मला तरी वाटतें. त्यांनीं आतां मला यांत गोवूं नये!

**रामचंद्रबाबा.**—राजे, खरें म्हणतां आपण. ह्या खंडेरावांनीं व माधवसिंहजींनीं आपले फार मोठे अपराध केले आहेत. त्या अपराधास सीमा राहिली नाहीं. आपले मित्र महाराणाजी व त्यांच्या सर्व स्त्रियांची हत्या करून त्यांनीं आपणांस दुःखांत लोटलें.

**राजे जयाजीराव.**—बाबा, इतक्यावर तरी थांबले कां? अहो, आम्हांला व आमच्या सरदारांना मोठी मेजवानी करून जेवणास बोलाविलें. काकासाहेब जाण्यास राजी झाले पण मला कला दासीनें ताबडतोब सावध केलें. म्हणून मी व माझे सरदार वांचलों. दोन मण सोमलखार मिसळून आमच्याकरितां तयार केलेलें अन्न दुसऱ्या दिवशीं माधवसिंहजीनें मातींत पुरून टाकलें. बाबा, या दुष्टपणाला कांहीं सीमा आहे कां? आणि काकासाहेबांनींही आम्हांला त्या वेळीं आग्रह केला. माधवसिंहजीनें आमच्या बाबतींत केवढा दुष्टावा मांडला होता याची कल्पना काकासाहेबांना नव्हती का?

**गंगाधरपंत.**—राजे, सुभेदारांना यांतील अवाक्षर देखील माहीत नव्हतें? ही गोष्ट कळल्यावर सुभेदार माधवसिंहजींवर फारच रागवले. त्यांचें कपट इतकें भयंकर होतें कीं त्यामुळें सर्व मराठ्यांचाच घात होणार होता!

**राजे जयाजीराव.**—पंत, एवढ्यावरच भागलें नाहीं. स्वतःचा बेत फसल्यावर आपल्या सरदारांच्या मार्फत आमच्या सरदारांस शहरांत मेजवानीस व नाचरंग पहाण्यास बोलाविलें. आमचे सरदार भोळे. आम्हांला न विचारतांच ते शहरांत गेले. ते आंत शिरतांच शहराचे दरवाजे बंद करून घेऊन त्यानें कापाकापी सुरूं केली. पंत, जवळ जवळ तीन हजार लोक दोन्ही पक्षाचे कापले गेले व एक हजार जखमी झाले. जे वांचले ते कुसावरून उड्या मारून बाहेर पडले. कोणाचे पाय मोडले, तर कोणाच्या कमरा मोडल्या! आमच्या सैन्यांत हाःहाःकार उडाला! माणसानें कोठवर

अन्याय सहन करावेत ? यालाही कांहीं सीमा आहे कीं नाहीं ? म्हणूनच आम्हीं या जयपुरप्रकरणांतून आतां अजीबात अंग काढून घेणार आहोंत! असल्या कपटी, घातकी, राजपुरुषांशीं आम्हांला संबंध ठेवावयाचा नाहीं!

**गंगाधरपंत.**—राजे म्हणतात तें ठीक आहे. सुभेदारही आतां अगदीं विटून गेले आहेत. त्यानांही ही गोष्ट मुळींच पसंत नसून माधवसिंहजी धोकेबाज आहे हें अगदीं स्पष्टपणें त्यांना कळून चुकलें आहे! म्हणून माझी विनंति अशीं कीं सर्व गुन्ह्यांची भरपाई करून घेऊन आपण या प्रकरणाचा निकाल लावावा!

**रामचंद्रबाबा.**—सरकार, एकदां याचा सोक्षमोक्ष करून घेऊन आपण आपल्या फौजा घेऊन उज्जैनकडे जाऊं, म्हणजे कांहीं कटकट रहाणार नाहीं. सुभेदारांचे आणखी एक वेळ ऐकावें व सर्व प्रकरण मिटवून टाकावें.

**राजे जयाजीराव.**—बाबा, आम्हीं तरी हाच विचार केला आहे. प्रथम संताप येऊन असें वाटत होतें कीं कांहीं करावें व जयपुरला तोफा लावून सर्व शहर उडवून लावावें. त्या दुष्ट माधवसिंहजीस तोफेच्या तोंडीं देऊन सर्व गुन्ह्यांचा बदला घ्यावा! पण सुभेदार काकासाहेबांनीं त्यास अंगेजला असल्यानें आम्हांला त्यांच्या वयाला मान देऊन स्वस्थ रहावें लागत आहे.

**गंगाधरपंत.**—राजे, अशीच समजूत घेऊन हें प्रकरण आतां मिटवून टाका. (मल्हारराव, खंडेराव, व माधवसिंहजी येतात) हे पहा सुभेदारच आपणांस विनंति करण्यास आले आहेत !

**सुभेदार मल्हारराव.**—अप्पा, राजे, मी तुमचा अपराधी आहे. मला तुम्हीं क्षमा करा. या मुतालकीच्या मदिरेनें आलेली माझी धुंदी पार नाहींशी झाली आहे ! खंडेरावाच्या पुत्रमोहानें मी अंध झालों होतों. दुष्ट माधवसिंहजीनें ह्या खंडेरावास पुरता बिघडवून मलाही गैरमार्गी बनविलें. जातां झाल्या गोष्टीस इलाज नाहीं. खंडेराव, माधवसिंहजी धरा अप्पांचे पाय व पुनः असें करणार नाहीं अशी माफी मागा ! (ते दोघेही राजांच्या पाया पडून खालीं मान करून उभे राहतात.)

**रामचंद्रबाबा.**—सरकार, तिघांनींही आपली माफी मागितली आहे व माधवसिंहजीस आतां पूर्ण पश्चात्ताप झालेला आहे. म्हणून सर्वांनाच उदार अंतःकरणानें माफी द्या. झाल्या-गेल्या गोष्टी आतां विसरून जा !

**गंगाधरपंत.**—खरेंच राजे, एवढी आमची विनंति ऐकाच!

**सुभेदार मल्हारराव.**—माधवसिंहजी, अप्पाला शरण जा व दयेची याचना कर.

**माधवसिंह.**—शिंदेराव, मी अगोदरच पश्चात्तापानें दग्ध झालों आहे. राज्यतृष्णेनें अनेक दुष्ट कामें मी केलीं. मी लाजेनें मरून चूर झालों आहे. (पुनः पाया पडतो) आपलें सागरासारखें उदार हृदय आहे ! आपण जरूर मला माफी कराल अशी आशा आहे.

**राजे जयाजीराव.**—जो शरण आला, त्याला मरण देणें हें काम शिंदेरावांचें नाहीं ! जे मस्तवाल होतील त्यांचा बंदोबस्त मात्र आम्हीं केल्याशिवाय सोडीत नाहीं. माझ्या मित्राचे तरी आतां कोण राहिलें आहे ? कोणासाठीं आतां यातायात करावयाची आहे ? काकासाहेब सांगतील तसा ठराव करून हें प्रकरण मिटवून टाका !

**सुभेदार मल्हारराव.**—शाबास, असा उदारधि मीं मुळींच पाहिला नाहीं. माझ्या मित्राचा सवाई शिकंदर असा तुझ्यासारखा पुत्र पाहून माझ्या डोळ्यांचें आज पारणें फिटलें आहे. अप्पा, धन्य आहे तुमची व तुमच्या उदार अंतःकरणाची !




श्री. माधवसिंहजी :- काका साहेब म्हणतात त्या सर्व गोष्टी मला मान्य आहेत. शिंदेरावांनीं वडील बंधु म्हणून या अपराधी लहान बंधूस क्षमा करावी. (पुनः पाया पडतो)

**राजे जयाजीराव.**—काकासाहेब, आपल्यासारख्या वडिलांनीं शुभकामना प्रकट केली यांत आम्हांस सर्वकांहीं मिळालें. जगांत दया, धर्म, एकमार्गीपणा, निष्कपटवृत्ति, वगैरे वृत्तींचा फैलाव व्हावा अशी श्रीज्योतिर्लिंगास आमची प्रार्थना आहे. आम्हां मराठ्यांच्या एकनिष्ठ सेवेनें हिंदवीस्वराज्यवृक्ष पूर्ण वाढीस लागो अशी त्या प्रभूजवळ आपण सर्वच प्रार्थना करूं !

**सुभेदार मल्हारराव.**—माझ्या पश्चात्तापानें दग्ध झालेल्या मनासही असेंच वाटत आहे. माधवसिंहजीस महाराणापद तुझ्या हस्तें देववून, घोडी, लुटलेला माल व कबूल केलेली बासष्ट लक्षांची खंडणी आज रोख त्याकडून घ्यावी व हें जयपुरप्रकरण मिटवून टाकावें, अशी माझी इच्छा आहे.

**माधवसिंह.**—काकासाहेब म्हणतात त्या सर्व गोष्टी मला मान्य आहेत. शिंदेरावांनीं वडील बंधु म्हणून या अपराधी लहान बंधूस क्षमा करावी. (पुनः पाया पडतो).

**राजे जयाजीराव.**—(त्यास उठवून आलिंगन देतात) ऊठ भैय्या, तुला सर्व गुन्हे माफ आहेत. तुम्हीं नीट सरळ मार्गानें वागून जयपुरचें राज्य चालवा. दिल्लीचे बादशहा व हिंदुपदपातशाही ह्या दोहोंची सेवा करण्याचा आपल्या वडिलांप्रमाणें—सवाई जयसिंह महाराणाजींप्रमाणें—प्रयत्न करा. काकासाहेब, या मुतालकीच्या नाटकाचा शेंवट हा असा दुखःकारक झाला !

**माधवसिंह.**—पुण्यवंत पुण्यपुरुषाच्या पदस्पर्शानें पदरजही सुवर्णरज होऊं शकतात. हेंच आज अनुभवास आलें आहे !

**सुभेदार मल्हारराव.**—निदान माझ्यासारख्या मत्सरी म्हाताऱ्यास ही गोष्ट आतां पूर्णपणें पटली आहे. मल्हारीमार्तंड आमच्या मनांतील वाईट भावना यापुढें जरूर दूर करो !

**राजे जयाजीराव.**—काकासाहेब, महांकाळेश्वर आपली इच्छा जरूर पूर्ण करील.

## भरतवाक्य.

(चाल—राधेकृष्ण बोल०).

धन्य धन्य व्हाल सदया, धन्य धन्य व्हाल ॥ ध्रु० ॥
भावभक्तिनें नाटचें रचुनी, अर्पण करितों हीं तव चरणीं ॥
स्वीकारि हे दीनदयाल ॥ सदया ॥ ध्रु० ॥



॥ श्री ॥

लेखकानें लिहिलेले

# शिलेदार-ग्रंथमालेचे शालोपयोगी ग्रंथ.

१. शिंदेशाही इतिहासांतील सुलभ गोष्टी.

२. हिंदुस्थानच्या इतिहासांतील सुलभ व मनोरंजक गोष्टी, प्रथम ग्रंथ.

३. हिंदुस्थानच्या इतिहासांतील सुलभ व मनोरंजक गोष्टी, द्वितीय ग्रंथ.

४. नाट्यरूप शिंदेशाहीः—

(१) प्रथम नाट्य.–संगीत मधुमीलन ..श्री० राजे राणोजीराव शिंदेराव व श्री० चिमणाबाईसाहेब यांची विवाहकथा.

(२) द्वितीय नाट्य.–मुतालकी ..श्री० राजे जयाजीरावांची जयपुरची स्वारी.

(३) तृतीय नाट्य.–संगीत रक्षाबंधन ..श्री० राजे जयाजीरावांची जाटांवरील स्वारी.
( कुंभेरीचा वेढा ).

(४) चतुर्थ नाट्य.–संगीत बलिदान ..श्री० राजे जयाजीरावांची जोधपुरची स्वारी.
( नागोराचा वेढा ).

(५) पंचम नाट्य.–संगीत भीमबहाद्दर ..श्री० राजे दत्ताजीरावांची निजामावरील स्वारी.
(शिंदखेडची मोहीम).

